# ऊर्मिला

## अंक पहिला

[ ना. दाजीसाहेबांच्या बंगल्याचा मुख्य दिवाणखाना. सजावट अद्ययावत्. रंगभूमीच्या मागील बाजूस व्हरांडा व त्यांतून आंत येण्यासाठीं मुख्य दरवाजा. दोन्ही बाजूंना आंतील खोल्यांत जाण्यासाठीं दरवाजे व त्यांवर सोडलेले रंगीत, जाळीचे पडदे. पुढील अंगास वर जाण्यासाठीं जिना. कोपऱ्यांत रेडिओ सेट, ड्रेसिंग टेबल, तर मध्यें कोच, खुर्च्या, टीपॉय् वगैरे. पडदा उघडतो.

वाद्यांची सुरावट ऐकूं येते. त्याच्या मागोमाग गाण्याची तान कानावर येते. आणि अर्धवट नाचत आणि गाणें म्हणतच अलका प्रवेश करते. अलका ही दाजीसाहेबांची पुतणी. सुंदर, आकर्षक. आज तर ती विशेष खुशींत आहे. गाणें संपतां संपतां ती आपल्या अंगाभोंवतीं गिरकी मारते. सुरावट समेवर येते. गाणें संपतें आणि त्याच वेळीं अलकाचा धक्का लागल्यामुळें गडबडीनें आंत येणाऱ्या भाऊकाकांच्या हातांतील सर्व कागद खालीं पडतात. भाऊकाका हे ना. दाजीसाहेबांचे खाजगी कारकून. बरींच वर्षें घरांत वावरल्यामुळें त्यांचें सारेंच वागणें घरच्यासारखें, घरोब्याचें आहे. ]

**भाऊकाका :** संभाळा...संभाळा अलकाताई! काय हें! आतां मी आपला वयस्कर माणूस आहे अन् कुणीं पाहिलं नाहीं म्हणून बरं, नाहीं तर लोक म्हणाले असते, बराच आहे कीं हा कारकुंडा! (आपल्याशीं हंसतात आणि कागद गोळा करूं लागतात.)

**अलका :** (कांहींशा आश्चर्यानें आणि मग दिलगिरीनें) कोण? भाऊकाका तुम्ही? क्षमा करा हं! मला वाटलं...

**भाऊकाका :** काय वाटलं? आला कोणी तरी...अं?

**अलका :** छे, कुणीतरी कसं ? मी आपली माझ्या नादांतच होतें. जेव्हां तुमचा धक्का लागला तेव्हां वाटलं...वाटलं कीं, श्रीनिवासच आला. माझं मुळीं आज कशांत लक्षच नाहीं. मी काय करतें आहें हें माझं मलाच समजत नाहीं. एकदां वाटतं, गावं, कुणींतरी ऐकावं अन् त्याच्यासाठीं आपण गावं. एकदां वाटतं नाचावं—खूप, या दिवाणखान्याभर—साऱ्या घरभर नाचतच सुटावं, ( स्वर बदलीत ) अन्—

**भाऊकाका :** ( तिची नक्कल करीत ) एकदां वाटतं—

**अलका :** हो वाटतंच मुळीं ! वाटतं कीं, कुणी तरी आपली वाट पहात आहे. हलके, नकळत त्याच्यामागें जावं, डोळे झांकावेत अन् एखाद्या लहान मुलासारखं 'कुर्र्' करून त्याच्या कानाशीं ओरडावं नि मग तें माणूस दचकेल. ( आपल्याशीं हंसते. )

**भाऊकाका :** गा ! अलकाताई,-गा ! अगदीं मोठमोठ्यानं गाणीं म्हणा. नाहीं आम्हांला ऐकवलीं तर आम्ही कानांत बोटं घालूं, पण तुम्ही गा. नाचा, घरभरच काय, पण घर डोक्यावर घेऊनसुद्धां नाचा. अन् एखाद्याच्या कानांत लहान मुलासारखं 'कुर्र' करून ओरडादेखील ! पण माझ्यासारख्या म्हाताऱ्यावर असले धक्के खाण्याचा प्रसंग आणूं नका म्हणजे मिळविली. नाजुक झाले तरी धक्के खाण्याचं का हें वय आमचं ? आज ही एवढी खुशी कशासाठीं ? श्रीनिवास डॉक्टरकीची परीक्षा पास झाला, त्याला आनंद होणं अगदीं स्वाभाविक आहे. मित्राच्या संभाळलेल्या मुलाच्या जबाबदारींतून पार पडल्याचं केवढं समाधान लाभेल मालकांना. जो येईल त्याला, जो भेटेल त्याला पेढे वांटतील ते !

**अलका :** पपांचं हें असंच असतं. पूर्वीच्या काळच्यासारखी मंत्री झाल्यावर त्यांना हत्ती नी अंबारी मिळाली नाहीं म्हणून बरं, नाहींतर हत्तीवरून साखर वांटली असती त्यांनीं. ( अर्धवट आपल्याशीं ) पण आजचा माझा आनंद, माझं सुख, पपांच्याच काय पण श्रीनिवासच्या आनंदापेक्षांदेखील केवढं तरी मोठं आहे— केवढं विशाल आहे ! ( एकदम ) विचारा कीं कसं तें. पण तुम्हांला तरी कसं कळणार ?

**भाऊकाका :** अगदीं खरं बोललांत अलकाताई ! मला काय कळणार त्यांतलं !

**अलका :** किती खोटं बोलतां भाऊकाका! भाऊ, विचारूं? रागावणार नाहीं ना तुम्ही? ( भाऊकाका मानेनें नाहीं म्हणतात. ) तुम्हीं प्रेम केलं आहे कधीं?

**भाऊकाका :** ( मोठयानें हंसत ) छे छे! भलतंच! इतकं सवंग नव्हतं झालं प्रेम आमच्या वेळीं! मुबलक साखर मिळत होती म्हणून असेल कदाचित्, पण प्रेमाची गोडी अनुभवायची वेळच नाहीं आली. आतां काय, ज्या त्या वस्तूची टंचाई–ज्या त्या वस्तूची टंचाई! त्यामुळं प्रेमासारख्या–ज्याला कवि लोक अनमोल म्हणतात अशा–किंमत नसलेल्या गोष्टीला, भलताच भाव चढला आहे! धान्याची सुबत्ता नाहींशी झाली, अन् वाटेल त्या ओसाड जमिनींत, प्रेमाचीं रोपटीं हां हां म्हणतां जीव धरूं लागलीं, फोफावूं लागलीं! आमचं आपलं...कसचं नि काय घेऊन बसलांत!

**अलका :** अहं! आज मी असली टाळाटाळी मुळींच चालूं देणार नाहीं. कितीक दिवस विचारीन विचारीन म्हणून घोकीत होतें, पण विचारायला जीभ अडखळत होती. तुमचं हें एकलकोंडं नी एकाकी जीवन पाहिलं कीं नाना तऱ्हेचे विचार मनांत येतात नि वाटतं...( आनंदी वृत्तीचे भाऊकाका अस्वस्थ होतात. ) भाऊ, भाऊ खरं सांगा, असं कां घडलं? भाऊ, तुम्हीसुद्धां कधीं प्रेम...भाऊ—

**भाऊकाका :** अलकाताई, प्रत्येकजण आयुष्यांत कधीं तरी जिवाभावाचं प्रेम करतो. कधीं तें अव्यक्त असतं, कधीं तें सहानुभूतीच्या आपुलकींतून निर्माण होतं, तर कधीं आसक्तीच्या आकर्षणातून. पण खऱ्या नि विशुद्ध प्रेमाची सफलता मात्र—

**अलका :** ( भाऊकाकांच्या जवळ जाऊन आपलेपणानें ) भाऊकाका!

**भाऊकाका :** ( जुन्या आठवणी गोळा होऊन ) अलकाताई, दरिद्री खेड्यांतला गरीब माणूस मी, इवलंसं माझं तें जग! तिथं मीं ती स्त्री पाहिली. आमच्या शेजारची बालविधवा होती ती. पांढऱ्या पायाची म्हणून तिचा छळ होत होता. कष्टांच्या ओझ्यांनीं वांकलेलं तिचं जीवन मी पहात होतों. करुण कंपांनीं भारावलेलं तिचं तें जीवन-संगीत मी ऐकत होतों. सहानुभूतीसाठीं, साहाय्यासाठीं भुकलेले तिचे डोळे शून्यपणें जगाकडे पहात, पण त्यांत कुठलेच भाव, भावना आणि विकार राहिले नव्हते. अश्रूंनीं पार धुऊन गेलं होतं सारं! मी

तिच्याबद्दल सहानुभूति वाळगूं लागलों. प्रेम करूं लागलों मी तिच्यावर— ( थांबतात. )

**अलका :** ( जरा वेळानें ) मग?

**भाऊकाका :** मग काय? ( तिच्यापासून दूर होत ) तिच्या घरांतल्या माणसांच्या तें ध्यानांत आलं. त्यांनीं तिला माहेरीं पाठवून दिली. माझं भ्याड मन समाजाच्या विरुद्ध जाण्यास भ्यालं. माझं प्रेम अव्यक्तच राहिलं. पण त्या बिचारीनं मात्र शेवटीं जीव दिला...जगांत जगण्याला कंटाळून. फार फार लागलं तें माझ्या मनाला. माझ्यामुळं बिचारीनं...( अस्वस्थ होतात. )

**अलका :** भाऊ, ( आपुलकीनें त्यांच्याजवळ जाते. ) भाऊकाका, म्हणून तुम्हीं लग्न केलं नाहींत?

**भाऊकाका :** होय बेटा! ( एकदम चमकून ) अलकाताई, क्षमा करा. भावनेच्या ओघांत मीं आपल्याला...

**अलका :** भाऊ, ऊर्मिलेला तुम्ही ऊर्मिलाच म्हणतां नि मला मात्र अलकाताई! मालकांच्या मुलीपेक्षां पुतणीला जास्त मान—जास्त मोठेपणा!

**भाऊकाका :** अलकाताई, ऊर्मिला मालकांची मुलगी झाली तरी ती एवढीशी चिमुरडी असल्यापासून अंगाखांद्यावर खेळविली मीं तिला. पण तुम्ही शिक्षणासाठीं दोन वर्षांपूर्वी इथं आलांत त्या वेळीं माझ्यासारख्या नोकर माणसांनीं आपल्याला 'अहो'च म्हणायचं. तें वळण पडलंय जिभेला.

**अलका :** पण आतां मीच सांगतें. बाबा वारल्यावर मी माझ्या चुलत्यांकडे राहूं लागलें, पण आज मला माझे वडील भेटले. भाऊ, मघांशीं म्हणालांत तसं 'बेटा' अलकाच म्हणा या अलकाला. ( जरा वेळानें ) पण भाऊ, मीं विचारलं त्याचं उत्तर?

**भाऊकाका :** म्हणजे असं विचारलंस तरी काय? काय विचारीत होतांत —होतीस तूं?

**अलका :** तुम्हीं लग्न कां केलं नाहींत? सारं आयुष्य असं एकाकी कां घालवतां तुम्ही?

**भाऊकाका :** पोरी, अग, एकदां तडा गेलेली काच का पुन्हां सांधतां येते? एकदां भावनेचीं फुलं वाहिलीं, त्यांचा निर्माल्य घेऊन का पुन्हां प्रीतीचे गजरे

गुंफायचे ? ( एकदम स्वतःला सांवरीत ) पण आजच कशाला हा विषय काढलास तूं ? आज पंचवीस वर्षे होऊन गेलीं, अलका, हृदयाच्या जखमांवरच्या काळाच्या या खपल्या हलक्या हातानें दूर काढल्या तरी...छे, आज तुम्ही सारीं आनंदांत दंग असतांना एका कारकुनाची ही कुरकूर किती बेसूर वाटते नाहीं ? ( विषय बदलण्यासाठीं ) बोलण्याच्या नादांत तुझ्या ह्या ऐटीकडे माझं लक्षच नाहीं गेलं. हा एवढा थाटमाट कशासाठीं ?

**अलका :** ( भाऊकाकांचें बोलणें मनांत रेंगाळत असतांना ) सिनेमाला जाणार आहोंत आम्ही आज.

**भाऊकाका :** आम्ही ? म्हणजे अलका, तूं, श्रीनिवास आणि ऊर्मिला ? ( अलका हूं म्हणते ) तर श्रीनिवास कुठें आहे ? ऊर्मिला दिसत नाहीं ती ? तीन वाजून गेले, उशीर नाहीं का होणार मग ?

**अलका :** मॅटिनीच्या शोला जायला का शाळेंतलीं मुलें आहोंत आम्ही ? संध्याकाळीं पिक्चर, मग...मोठ्ठाच बेत ठरवला आहे आम्हीं आज....मी नि श्रीनिवासनीं मिळून !

**भाऊकाका :** अन् ऊर्मिला...

**अलका :** ( भाऊकाकांचें बोलणें न ऐकून ) संध्याकाळीं पिक्चर, मग रेस्टॉरांत जेवण, मग रमत गमत, फिरत फिरत रात्रीं घरीं परत !

**भाऊकाका :** अलका, ऊर्मिलाबद्दल बोलण्याचं मघाचपासून टाळते आहेस तूं...ती येणार आहेना बरोबर ?

**अलका :** त्यांत कसली टाळाटाळी ! अन् ती येणार कीं नाहीं हें मी कसं सांगूं ? श्री पास झाल्याचा फोन मघाशीं आला नि आमचा ठरलेला बेत सांगण्यासाठीं मी नि श्रीनिवास तिच्या खोलींत गेलों, पण ती तिथं नव्हती. ती बाहेर गेली होती...! आजकाल नेहमींच ती आमच्यापासून दूर दूर रहाते, तीच आम्हांला टाळीत असते.

**भाऊकाका :** अस्सं ! ( जरा वेळानें ) अलका, जरा स्पष्टच विचारतों. तुम्ही दोघी बहिणी — जिवाभावाच्या मैत्रिणी म्हणून विचारतों. आजकाल ऊर्मिला अशी सगळ्यांशीं बोलण्याचं मिसळण्याचं टाळीत कां असते ? अशी एकलकोंडी कां बनली आहे ती ? काय झालंय् तरी काय तिला ? ( चेष्टेनें ) काय ग ह्या दोन्ही मांजरं भांडलीं कीं काय ?

**अलका :** कोण ? ऊर्मिला आणि मी ? भलतंच !! ( हंसण्यावारी नेते. )

**भाऊकाका :** अलका, तूं श्रीनिवासवर प्रेम करतेस. ( अलका बोलत नाहीं पण तिचे डोळे बोलतात, गाल सांगतात. ) तरीच, तरीच भांडताहेत हीं मांजरं ! डोळे झांकून दूध पिणाऱ्या मांजरा, ज्या श्रीनिवासवर तूं प्रेम करतेस त्यावर ऊर्मिलाचं पण प्रेम असेल, हें कसं नाहीं तुझ्या ध्यानांत आलं ?

**अलका :** ( एकदम मोठ्यानें हंसते ) भाऊकाका चुकलं हं ! हा मात्र तुमचा अंदाज साफ चूक ठरला. श्रीनिवासवर ऊर्मिलाचं प्रेम...छे मुळींच नाहीं !

**भाऊकाका :** कशावरून म्हणतेस तूं हें ?

**अलका :** ( भाऊकाकांपासून दूर होत ) माझं नी श्रीचं एकमेकांवर प्रेम आहे हें तिला माहीत आहे. ( लाजून ) एकदां तर मला आणि श्रीनिवासला एकमेकांच्या बाहुपाशांत असतांना अचानकपणें पकडून तिनं मला 'वहिनी' अशी हांक मारली होती...

**भाऊकाका :** खरं सांगतेस तूं हें ? कळलं बरं पोरी ! तुझ्या त्या गाण्यानाचण्याचा आणि कानांत 'कुर्र' करून ओरडण्याचा सारा अर्थ मला समजला ! ( नाटकीपणानें ) बरं चला ! मी आपला जबाबदारींतून सुटलों ! देवाला काळजी !

**अलका :** ( गोंधळून ) जबाबदारींतून ? मीं मोकळं केलं ?

**भाऊकाका :** खोटं का आहे तें ? असं पहा, तुझं तूं आपलं जमवलंस म्हणून ठीक ! नाहींतर तुझ्यासारख्या खटयाळ मुलीला नवरा धुंडाळायला कोण दगदग पडली असती मला. हो, बेटी म्हटलंय् ना तुला ! ( जरा वेळानें ) पण काय ग, मालकांना आहेत का ठाऊक तुमचीं हीं नवीं नातीं ?

**अलका :** ( हंसत ) अं...हं ! पण आज श्री पास झाला. त्याला सरकारी हॉस्पिटलमध्यें हाउस सर्जनची नोकरी पण मिळवून देणार आहेत कॉलेजचे प्रिन्सिपॉल. मग तोच विचारील पपांना. ( लाजते. )

**भाऊकाका :** छान ! फार छान ! तरीच एवढया खुशींत आहे स्वारी ! तो माझा राजा नि मी त्याची राणी म्हणे ! ए राणी, राज्यांतल्या प्रजेवर लक्ष असूं दे हं !

**अलका :** ( गाल फुगवीत खोट्या रागानें ) आम्ही नाहीं जा ! बेटा म्हणा म्हटलं

म्हणून अशी थट्टा नाहीं हं करायची. (भाऊकाका हंसतात. ती जास्तच गोंधळते, रागावते.)

**भाऊकाका :** रागावलीस वाटतं ? क्षणांत लाजतेस काय ! रागावतेस काय ! तुम्हां बायकांजवळ राग आणि अनुराग जसा ठेवलेला. एक बसतो नाकाच्या शेंड्यावर आणि दुसरा लपतो गालाच्या खळींत ! (अलका बाहेर जाऊं लागते) हें काय, संध्याकाळचा आहे ना तुमचा कार्यक्रम ?

**अलका :** श्री घरीं यायच्या आंत शैला नाईककडे जाऊन येणार आहें. श्री पास झाल्याचं तिला सांगायचं नि...

**भाऊकाका :** पेढे द्यायचे. हो ना ? मग हे घे ना बरोबर. (टीपॉय-वरचे पेढे तिला देतात.)

**अलका :** (एक स्वतःच्या तोंडांत टाकते नि बाकीचे खालीं ठेवते.) अभ्यास केला श्रीनं, पास झाला माझा श्रीनिवास...

**भाऊकाका :** म्हणून काय एकट्या श्रीनिवासचं तोंड गोड करायचं होय ? मग मात्र सिनेमाचा चांगला प्रोग्रॅम निवडलास तूं...

**अलका :** (खोट्या रागानें, विलक्षण लाजून) भाऊ... (एकदम जाते.)

**भाऊकाका :** (आपल्याशीं हंसत) सदा श्रीनिवास, श्रीनिवास, श्रीनिवास अगदीं वेडी झाली आहे ही त्याच्यासाठीं ! (जरा वेळानें माडीवर जाण्यासाठीं जिना चढूं लागतात, तोंच बाहेर मोटारचा हॉर्न वाजतो. भाऊ थबकतात. जरा वेळानें ना. दाजीसाहेब दिवाणखान्यांत येतात. मागोमाग ड्रायव्हर ऑफिसब्रीफ आणून ठेवतो नि जातो. भाऊकाका जिना उतरत...) तरी मी म्हणत होतों चार वाजायला झाले, त्या बक्षीससमारंभाला जायचं त्याची आपल्याला आठवण आहे का नाहीं ? थोडीशी वाट पाहून फोनच करणार होतों मी सेक्रेटरीएटमध्यें...

**दाजीसाहेब :** चार वाजायला आले हं ! हें मंत्रिपद आम्हांला मिळाल्यापासून घड्याळांचे कांटे फार वेगानं धावायला लागले आहेत. छेः ! आपण तर या कामाखालीं अगदीं बेजार झालों. दिवसाचे अठरा अठरा तास काम करून-देखील उरक नाहीं. कुठून ती सुखाची वकिली सोडली नि मिनिस्टरीचं लोढणं गळ्यांत घेतलं असं वाटायला लागलंय्, कोण दगदग ! कोण त्रास ! बरं,

एवढं करून जिवाला समाधान नाहीं कीं जनतेला सुख नाहीं. काय एकएक टीका आणि टीकाकार! धन्य आहेत! आपण काय लिहितों, काय बोलतों, कोणी कांहीं पाहात नाहीं. बस्स! उठायचं नि मंत्र्यांविरुद्ध कोल्हेकुई करायची! काय वाटेल तें होवो, येत्या निवडणुकींत पडायचं नाहीं.

**भाऊकाका :** कां? आज कांहीं विशेष झालं वाटतं?

**दाजीसाहेब :** विशेष काय असायचं? जिकडे तिकडे कापडाचा खोटा तुटवडा पाडताहेत हे व्यापारी. धोतरं नाहींत, पातळं नाहींत ही ओरड उठली आहे जिकडे तिकडे!

**भाऊकाका :** हो ना. परवांच वाचलं, कीं तिकडे मद्रासमध्यें धोतरं मिळेनात म्हणून लोकांनीं पातळांचीं धोतरं बनवलीं.

**दाजीसाहेब :** अन् काल बिहारमध्यें पातळं नाहींत म्हणून बायका धोतरं नेसूं लागल्या. एवढं कापड निघतं तें सारं हे गिरणीवाले कुठें लपवतात कुणास ठाऊक! चांगला जालीम उपाय शोधण्यासाठीं जंग जंग पछाडतोंय् आम्ही, पण लोकांना वाटतंय् आम्ही झोंपा काढतों! देशाला स्वातंत्र्य मिळालं, मन मानेल तसं वागावं, सरकार आपलं, वाटेल तशी टीका करावी, ही यांची वृत्ति. मंत्री म्हणजे कोण्या झाडाचा पाला! वाटेल त्यानें ओरबाडावा नि वृत्तपत्रांच्या शेळयांना चरायला द्यावा. नामदारीपेक्षां नादारी पत्करली. ( जरा वेळ स्तब्ध ) पण भाऊ, सारीं मुलं कुठं गेलीं?

**भाऊकाका :** आज श्रीनिवासचा रिझल्ट होता.

**दाजीसाहेब :** ( एकदम ) अरे हो, आमच्या लक्षांतच नव्हतं. काय झालं?

**भाऊकाका :** पास! चांगला वरच्या नंबरानं पास झाला तो.

**दाजीसाहेब :** छान, फार छान! हुशार आहे पोरगा, आपल्या बापासारखा. आज तो असता तर—( जरा वेळानें ) हुशार माणूस! मोठा कल्पक. कष्ट करायची तळमळ होती, धडाडी होती. पण कुणावरहि विश्वास ठेवायचा या भोळसट स्वभावानं साऱ्या गुणांचं मातेरं झालं! आपण मेला, आपल्या पोराला पोरका केलान्.

**भाऊकाका :** पण आपण त्याला संभाळलंत! मायेच्या शालींत जीवनाची ऊब दिलीत. मोठं होणं, पैसा मिळविणं हें ज्याच्या त्याच्या कर्तृत्वाचं भूषण ठरेल. पण आपण त्याला दिलेला आसरा...जन्मभर तो कृतज्ञ राहील.

**दाजीसाहेब :** भाऊ, त्याच्या बापानें आत्महत्या केली, त्या वेळीं त्यानं माझ्यावर टाकलेल्या जबाबदारींतून मी मुक्त झालों. आतां या घराची, माझ्या ऊर्मिलाची जबाबदारीच श्रीनिवासवर सोंपविली कीं सुटलों. ( भाऊकाका दचकतात. ) त्या दोघांचं लग्न हीच एक इच्छा आहे माझी.

**भाऊकाका :** ( बोलूं का नको अशा आंदोलित मनोवृत्तींत ) पण मालक, आजकालचा हा बदलता जमाना! आपल्या इच्छा आणि विचार मुलांवर लादणं योग्य नाहीं... बरं दिसणार नाहीं.

**दाजीसाहेब :** भाऊ, आज कांहीं नाहीं तरी दहाबारा वर्षे तीं एकत्र राहिलीं. एकमेकांच्या सहवासांत त्यांना एकमेकांबद्दल प्रेम ... ( ते तिथेंच थांबतात. कारण श्रीनिवास येतो. ) या, या डॉक्टरसाहेब! अरे रिझल्ट लागल्यापासूनच प्रॅक्टिसला सुरवात झाली कीं काय तुझी?

**श्रीनिवास :** ( दाजीसाहेबांना वांकून नमस्कार करीत ) थोडासा उशीरच झाला. प्रिन्सिपॉलना भेटायला म्हणून गेलों नि तिथेंच सारा वेळ मोडला. ( हातांतलें घड्याळ पहात ) बापरे! चार वाजून गेले कीं ...

**दाजीसाहेब :** खरं कीं काय! प्रायमरी स्कूलच्या समारंभाला जायचं आहे. आम्हांला साडेचार वाजतां. छेः! हें मिनिस्टरीचं लोढणं गळ्यांत पडल्यापासून या सभा नि समारंभ यांनीं तर डोकं उठवलं आहे. जिथें तिथें उद्घाटक आम्ही, ज्याला त्याला अध्यक्ष मंत्री! सांगायचं काय प्रत्येक वेळीं? अन् चार शब्द आम्हीं सांगावेत ते ऐकण्यासाठीं का लोक बोलावतात? छे! नांव काढूं नका. कुणाला हवी असते ग्रँट, तर कुणाला हवी असते जाहिरात. एकजात सारे स्वार्थी. या जगांत जिथं पहावं तिथं हात पसरलेल्या अशा भिक्षेकऱ्यांच्या माळा! ( थोडें थांबून ) बरं तर श्रीनिवास, मग रात्रींच बोलूं आपण काय तें.

**भाऊकाका :** ( मध्येंच ) मालक, रात्रीं प्रोग्रॅम आहे त्यांचा!

**दाजीसाहेब :** होय रे? कुठें? सिनेमाला? अं? मग नवीन गाडी तुम्ही नेणार असाल? मान काय डोलवतो आहेस! घेऊन जा. पण संभाळ हं! त्या अलकाला मात्र ड्राइव्ह करूं देऊं नकोस. मोठी अवखळ आहे ती. खुशाल वेगानं गाडी सोडते. अपघातसुद्धां व्हायचा अशानं. तूंच ड्राइव्ह कर. काय समजलं? ( भाऊकाकांना ) भाऊ, आमच्यासाठीं ड्रायव्हरला जुनीच गाडी

काढायला सांगा. झालीच वेळ आमची. ( भाऊ जातात. ) हं मग काय, श्री, परीक्षा तर झालीच. आतां दवाखाना काढायला हवा. अंदाज घे एकदां काय खर्च येईल त्याचा...

**श्रीनिवास :** दाजीसाहेब, आतां नोकरी करावी असं ठरवलं आहे मीं, त्यासाठींच प्रिन्सिपॉलनीं बोलावलं होतं. ते सरकारी हॉस्पिटलमधली हाउस सर्जनची जागा मिळवून देतील बहुधा.

**दाजीसाहेब :** काय नोकरी ! छेः छेः ! त्या नोकरींत कांहीं राम नाहीं. मीच बघ ना ? काय बुद्धि झाली ती ही मिनिस्टरी पत्करली नि नसत्या जंजाळांत गुंतलों. ( जरा थांबून ) तुझे वडील, धंदा करण्याची केवढी हिंमत त्यांची !... चांगला स्वतःचा दवाखाना हवा, हॉस्पिटल हवं, ही महत्त्वाकांक्षा सोडून हें नोकरीचं वेड काय शिरलं तुझ्या डोक्यांत ? अं ! तुम्ही मुलं अजून लहान आहांत. आपलं हित अनहित तुम्हांला काय समजतंय् ! ...

**श्रीनिवास :** ( घुटमळतो, चांचरत ) पण दाजीसाहेब, आज दहा–बारा वर्षं तुम्हीं संभाळलंत, शिक्षण दिलंत आणि आतांदेखील माझ्यासाठीं...

**दाजीसाहेब :** श्री, डॉक्टर लोकांनीं एवढं भावनाविवश होणं बरं नाहीं. अन् काय रे, आपल्या माणसाचं का कुणी ऋण मानतात ? वेडा नाहींतर, अगदींच पोरकट आहेस कीं रे अजून ! दवाखाना, हॉस्पिटल, एवढंच काय जें जें माझं तें तें सारं तुला देणार आहें मी. कशा कशाचे आभार मानणार आहेस तूं ? ( इतक्यांत पोर्चमध्यें गाडी उभी केल्याचा आवाज होतो. भाऊकाका येतात. )

**भाऊकाका :** मालक, ड्रायव्हरनं पोर्चमध्यें गाडी उभी केली आहे.

**दाजीसाहेब :** (आंत जाऊन थोड्या वेळानें बाहेर येत येत ...) चला, दाजीसाहेब पोरांना बक्षिसं वाटायला. ( श्रीनिवासला ) श्री तें नोकरीचं वेड डोक्यांतून काढून टाक अन् दवाखान्याच्या मागं लाग. ( थोडें जाऊन, पुन्हां थबकून ) आणि हो, सिनेमा झाल्यावर रात्रीं जेवणपण बाहेरच असेल....

**श्रीनिवास :** कांहीं ठरवलं नाहीं अजून...

**दाजीसाहेब :** मग काय तें ठरवा नि तसं आचाऱ्याला सांगून जा. म्हणजे वाट नको पहायला. हेंसुद्धां आम्हीं सांगायचं. तुमच्या मुळीं ध्यानांतच येत

नाहीं. तुम्हां मुलांना आपण मोठीं झालों आहोंत हें केव्हां कळणार आहे कुणास ठाऊक ! ( जातात. )

**भाऊकाका :** ( दाजीसाहेब गेल्यावर जरा वेळानें ) काय डॉक्टरसाहेब !

**श्रीनिवास :** भाऊ....

**भाऊकाका :** तुम्ही नि अलका दोघंच सिनेमाला जाणार आहांत हें नाहीं सांगितलंत तें मालकांना !

**श्रीनिवास :** कोण म्हणालं ? ऊर्मिलापण येणार आहे.

**भाऊकाका :** मला नाहीं तसं वाटत. आजच्यासारख्या दिवशीं आपल्या भावाच्या अन् वहिनीच्याबरोबर सिनेमाला जायला तयार होण्याइतकी कांहीं ऊर्मिला असमंजस नाहीं. तिचं डोकंसुद्धां दुखायला लागेल ! तिला बरं नाहींसं होईल ! मग श्रीनिवास, तुम्ही नि अलका दोघंच जाल. ( श्रीनिवास आपल्याशीं हंसतो ) अलका तर मोठ्या खुषींत आहे. नाचते काय, गाते काय, नि लहान मुलासारखं कुणाच्या .:.श्रीनिवासच्या कानांत 'कुर्र ...' करून ओरडायचीसुद्धां लहर आली आहे तिला. ( आपल्याशीं हंसतात. )

**श्रीनिवास :** अगदींच पोरकट आहे अलका. स्त्री प्रेमानं इतकी मूर्ख बनते हें नव्हतं मला ठाऊक !

**भाऊकाका :** पोरकट ! नुसती मूर्ख ! श्रीनिवास, स्त्री ही परमेश्वरानं निर्माण केलेली एक अजब, मोठी विलक्षण प्रकृति आहे. जेव्हां ती विश्वासानं पुरुषाच्या स्कंधावर मान ठेवते तेव्हां ती सर्वस्वाचं दान देण्याइतकी मूर्ख बनते, वेडी होते. पण अविश्वासाच्या वासानं नागिणीसारखी उलटतेदेखील स्त्रीच ! प्रेमाच्या धुंदींत स्त्री बेहोष होते, तर प्रेमवैफल्यानं ती क्रूर बनते. म्हणूनच स्त्रीवर प्रेम करणं सोपं, पण प्रेमाचं नाटक करणं सोपं नाहीं श्रीनिवास !

**श्रीनिवास :** पण अलकावर माझं खरं प्रेम आहे.

**भाऊकाका :** ( एकदम ) पण ऊर्मिलेशीं तुमचं लग्न व्हावं अशी खुद्द मालकांची इच्छा आहे.

**श्रीनिवास :** नाहीं, तें शक्य नाहीं ! काय वाटेल तें झालं तरी मी अलकाशींच लग्न करीन. ( जरा वेळानें ) पहाल तुम्ही भाऊ, उद्यां जोडप्यानं आशीर्वादासाठीं तुमच्या पायाशीं आलों म्हणजे...

**भाऊकाका :** अष्टपुत्रा सौभाग्यवती भव असा आशीर्वाद देईन मी तिला...

**श्रीनिवास :** छे छेः! ( हंसतच ) मोठ्यांच्या आशीर्वादांत वराचं पुण्य असलं तरी असला वर खोटा पाडणं डॉक्टर श्रीनिवासच्या हातांत आहे हं भाऊ!

**भाऊकाका :** बघूं बघूं कीं आम्ही! ( श्रीनिवास घड्याळ पाहतो. ) घड्याळस पाहतां?

**श्रीनिवास :** अलका कशी नाहीं आली अजून?...

**भाऊकाका :** असं हो! मग बसा कीं असे पाठमोरे वाट पहात! हलकेच मागाहून येईल अन् डोळे झांकील. ( हंसतात. ) प्रेमिकांचं लक्षणच विलक्षण! एकट्याला एकटं एकटं वाटतं, दोघांत एकान्त अनुभवतात. अन् माझ्यासारखा तिऱ्हाईत ... जातोंच कसा मी इथून ... ( जाऊं लागतात. )

**श्रीनिवास :** खरंच निघालांत कीं काय भाऊ? थांबा ना जरा.

**भाऊकाका :** थांबून कसं चालेल? तुम्हां साऱ्यांच्या सौजन्यानं या घरांत घरच्यासारखा वावरतों मी, पण कांहीं झालं तरी कारकूनच. माझीं कामं... ( जातात. )

**श्रीनिवास :** ( भाऊकाका गेल्यावर टेबलापाशीं जाऊन आपल्याशींच ) अलका! अलका! तुला गावंसं वाटतं, नाचावंसं वाटतं अन् मला? ( आपल्याशीं गाणें गुणगुणत लागतो, मग तें स्पष्टपणें ऐकूं येतें. )

[ गाणें संपतें. ड्रेसिंग टेबलाशीं जातो आणि आरशांत पहात टॉयची गांट सैल करूं लागतो. तों त्याला चाहूल लागते. ऊर्मिला, दाजीसाहेबांची मुलगी प्रवेश करते. सुंदर पण काळजीनें काळंवडून गेलेली, हताश. आपल्याच नादांत असलेल्या श्रीनिवासला वाटतें अलकाच आली. ]

**श्रीनिवास :** या बाईसाहेब! आलांत शैलाला आमचा पराक्रम सांगून? अलका, खरं सांग ज्यांत त्यांत पुरुषाची वांटेकरीण होण्याची एवढी कां ग हौस तुम्हां बायकांना? आतां भाऊकाका सांगत होते, तूं गात काय होतीस, नाचत काय होतीस! वेडाबाई आहेस झालं! अशी गुपचुप उभी राहशील अन् हळूच मागून येऊन कुर्र...करून ओरडशील! पण सांगून ठेवतोंय्, जवळ तर ये अशी घट्ट पकडून ठेवीन कीं मग...( हंसतो, पेढ्याच्या ताटाकडे पाहून... ) अन् अलका, सगळ्यांना पेढे वांटलेस अन् या तुझ्या श्रीनिवासला? कां माझं तोंड पेढ्यानं गोड होणार नाहीं म्हणून...( इतक्यांत श्रीनिवासच्या कानांवर हुंदका

येतो. विलक्षण दचकून तो मागें वळून पाहातो. त्याला ऊर्मिला दिसते.) ऊर्मिला...ऊर्मिला तूं होय? मला वाटलं अलकाच आली. (निरखून पहात) अन् ऊर्मिला हें ग काय? रडतेस तूं! तूं रडतेस ऊर्मिला! काय झालं?

**ऊर्मिला :** (झटकन् डोळे पुशीत) कुठें काय? कांहीं नाहीं रे...

**श्रीनिवास :** खोटं! अगदीं खोटं. होय ना? मग हे डोळयांत अश्रु कां? तुला बरं नाहीं? काय होतंय्? (तिच्याजवळ जाऊन) बरं का ऊर्मिला, म्हटलं आज अस्मादिक डॉक्टर झाले! (जरा वेळानें) अरेच्या तरी तूं गप्पच! नक्कीच तुला कांहींतरी होतंय्. (तिचा हात हातांत धरीत तिला हंसविण्यासाठीं) बघूं दे नाडी. अं, आहे कीं जाग्यावर. पण उडते आहे धाड धाड एखाद्या इंजिनासारखी! आतां डोळे, डोळ्यांत पाणी आहे नी चागले पाणीदार पण आहेत. आतां जीभ. हं कर, ऑ......

**ऊर्मिला :** (विलक्षण तुटकपणें) सारखी रे काय थट्टा करतां श्री! मी म्हणजे एक थट्टेचा नि निंदेचाच विषय झालें आहें आजकाल!

**श्रीनिवास :** (दचकून) ऊर्मिला ... ऊर्मिला नक्कीच तूं... (तिच्याजवळ जाऊन) मी आज परीक्षा पास झालों. केवढ्या आनंदांत आहें मी. दाजीसाहेब खूष आहेत. अलका तर सारं घर डोक्यावर घेऊन नाचते आहे. सारं घर माझ्या आनंदाचं वांटेकरी झालं आहे. मघाशीं तुला सांगण्यासाठीं केवढ्या उमेदीनं मी नि अलका तुझ्या खोलींत गेलों, पण तूं घरींच नव्हतीस. कुठं गेली होतीस तूं? (तिच्यापासून दूर होत) मला वाटलं, तुलादेखील खूप आनंद झाला असेल, पण तूं मात्र अश्रु गाळते आहेस...

**ऊर्मिला :** तसं नाहीं रे श्रीनिवास...

**श्रीनिवास :** मग कसं? मग काय समजायचं मीं? तुझं अलीकडचं हें तुटक वागणं पाहिलं म्हणजे वाटतं, दाजीसाहेब मला मदत करतात तें तुला आवडत नसावं. तुला असं तर वाटत नाहीं ना ऊर्मिला, कीं आपल्या संपत्तीवर जगणारा हा आश्रित...

**ऊर्मिला :** श्रीनिवास! बोलवतं तरी कसं तुला हें! लहानपणापासून आपण एकत्र वाढलों तरी हीच ऊर्मिलाची ओळख पटली तुला? तुला अशी शंका तरी कां आली? (जरा वेळानें) पण घर फिरलं कीं घराचे वांसे फिरतात. डाव उधळला कीं गंजिफांतले राजे कवडीमोलाचे ठरतात. तूं असं बोलावंस...

**श्रीनिवास :** ( ऊर्मिला एकदम थांबलेली पाहून ) बोल ऊर्मिला, पुढें बोल, ( जरा वेळानें एकदम मृदुपणें ) बरं का ऊर्मिला, आज संध्याकाळीं सिनेमाचा प्रोग्रॅम ठरवला आहे अलकानं ! पिक्चर झालं कीं बाहेरच जेवण ! दाजीसाहेब मुद्दाम आपल्यासाठीं नवी गाडी ठेवून गेले आहेत. ( ऊर्मिला कांहींच बोलत नाहीं पण पुन्हां तिच्या डोळ्यांतून अश्रु ओघळतात, श्रीनिवास तिच्याजवळ जाऊन खांदे पकडतो. तिची मान वर करीत )ऊर्मिला, ऊर्मिला, आतां मात्र कांहीं एक ऐकणार नाहीं तुझं ! कुठं गेली होतीस तूं ?

**ऊर्मिला :** कुठं नाहीं. सहज आपली गेलें होतें.

**श्रीनिवास :** ऊर्मिला...( ऊर्मिला गप्पच ) ऊर्मिला, तुझ्या मनाला बोचणारं दुःख मला सांग. मी त्याची जळजळ कमी करण्यासाठीं...

**ऊर्मिला :** श्रीनिवास, कशाला उगीच सहानुभूतीच्या फुंकरीनें काळजाला जाळणारी आग विझवतोस ! जिच्यासाठीं तूं कांहीं करावंस अशी ही ऊर्मिला नाहीं. क्षमेची सांवली म्हणून कुणीसुद्धां सहानुभूतीचे पंख पसरणार नाहीं.( आवेगानें ) श्री, कलेवरावर चांगुलपणाचे हार चढवूं नकोस. भावनांचीं पांघरुणं घालून त्याचा भेसूरपणा लपवूं नकोस श्री !

**श्रीनिवास :** ( कठोरपणानें ) चूप ! आपण काय बोलतों आहोंत याचा अर्थ तरी कळतो तुला ?( मार्दवानें ) खरंच, ऊर्मिला, याचा अर्थ काय ? ( निश्चयानें ) नाहीं, सारं कांहीं मला कळलं पाहिजे....

**ऊर्मिला :** ( चमत्कारिक भीतीनें ) नाहीं, कुणालाच नाहीं कळतां कामा.

**श्रीनिवास :** फक्त श्रीनिवासला...तुझ्या श्रीला....

**ऊर्मिला :** ( शून्यपणें ) साऱ्यांना तें कळण्यापूर्वी—एकाच्या कुजबुजींतलं विष दुसऱ्याच्या कानांत ओतलं जाण्यापूर्वी—याचा शेवट करण्याची संधि मला हवी आहे. ( आवेगानें)श्रीनिवास तूं डॉक्टर आहेस. आहे अशी संजीवनी तुझ्याजवळ ? ही फसलेली, अंधारांत बुडलेली मूर्ख ऊर्मिला—( भावनातिशयानें शब्द कोंडले जातात, पण श्रीनिवासच्या सारें लक्षांत येतें. तोही क्षणभर सुन्न होतो. )

**श्रीनिवास :** ऊर्मिला, कोण तो ? कुणीं फसवलं ?

**ऊर्मिला :** ( संतापानें ) स्त्रीच्या असहायतेचा फायदा घेणाऱ्या पौरुषानें...

**श्रीनिवास :** चुकतेस तूं ऊर्मिला, मानवी जीवनाचे आलेख आपली शक्ति, बुद्धि आणि त्याग यांनीं लिहिणाऱ्या साऱ्या पुरुषजातीला दूषणं देऊं नकोस. पुरुष हा स्त्रीच्या असहायतेचा मारेकरी नाहीं, संरक्षक आहे. तो उन्मादाचा पुजारी आहे, लुटारू नाहीं. प्रीतीसाठीं गुंजारव करणारा भृंग आहे, फुलपांखरूं नाहीं. संतापानं तूं आंधळी झालीस, फसवणुकीनं तूं दुबळी झालीस, तरी साऱ्या पुरुषजातीला दूषणं देऊं नकोस! मी आहें ना? माझ्यावर तुझा विश्वास आहे ना? ऊर्मिला, विषावर मंत्राचा उपाय नसला तरी विष पचविणारा नीलकंठ.—

**ऊर्मिला :** एकटाच कैलासावर जगतो नि बाकी सारे कैलासवासी होतात. ( बोलणें संपविण्याच्या हेतूनें ) आतां कशाचा कांहीं उपयोग नाहीं.

**श्रीनिवास :** छेः छेः ! असं कां म्हणतेस तूं ? कोण तो ? त्याचं नांव ?

**ऊर्मिला :** (श्रीनिवास तिच्याजवळ जातो. बऱ्याच वेळानें नाइलाजानें ) नागेश !

**श्रीनिवास :** ( विलक्षण दचकून ) नागेश ! ( अस्वस्थपणें फेऱ्या घालतो. ) मला कल्पनासुद्धां नाहीं आली. इतका बदमाष आहे तो ?

**ऊर्मिला :** ( कांहींशी आपल्याशीं ) आयुष्याचीं बरींच वर्षे हालअपेष्टांत आणि तुरुंगांत गेलीं अशा एका देशभक्ताचा दुर्दैवी मुलगा आहे तो. मी त्याची शिक्षणाची, जगण्याची धडपड पहात होतें. नकळत मी सहानुभूति बाळगूं लागलें. जगानें झिडकारलेलं, परिस्थितीनं कोंडलेलं त्याचं जीवन मीं जवळून पाहिलं नि मला वाटलं, माझ्या सहवासांत त्याला दिलासा मिळेल. मी त्याच्या बोलण्यावागण्यावर भाळलें, सांवलीसारखी त्याच्या मागें मागें धावलें अन् त्या अननुभूत उन्मादी संमोहांत माझ्या मनाचा मागोवा घेत घेत माझं शरीर-देखील त्याच्या अधीन झालं...( तोंड झांकून घेते. )

**श्रीनिवास :** ऊर्मिला !

**ऊर्मिला :** ( पाठ करून ) पण ज्या वेळीं एक जीव...( ती शब्द गिळते, पण अश्रु ओघळतात. ) नाना प्रकारांनीं मीं त्याला विनवलं. नामदार दाजी-साहेबांची मुलगी एका हलकटापाशीं, एक अब्रूदार स्त्री म्हणून जगूं दे अशी भीक मागत होती—

**श्रीनिवास :** मग...मग काय म्हणाला तो ?

**ऊर्मिला :** मीं पदर पसरून विनवणी केली, पण त्यानं मात्र तोच पदर अंगावरून...( आवेगानें आवंडा गिळून ) श्री, भिक्षेकऱ्याला नेहमींच भिकेऐवजीं शिव्या अन् भाकरीऐवजीं दगड मिळतात. त्यानं चुकवाचुकव चालविली.

**श्रीनिवास :** काय नीच आहे ! शरम नाहीं वाटली त्याला ?

**ऊर्मिला :** ( विषण्ण मनानें ) शरम ! उलट त्यानं बेशरमपणें माझ्याकडून पैसे उपटण्यास सुरुवात केली. ( असहायपणें मान टेकते. )

[ भांबावलेला श्रीनिवास तिच्याकडे नुसता पहातच असतो. त्याच वेळीं बाहेरून आलेला नागेश येतो. क्षणभर तो दचकतो, पण श्रीनिवास नि ऊर्मिला एकत्र पाहून तो हंसतो. ]

**श्रीनिवास :** ऊर्मिला, तो तुझ्याकडून पैसे उपटत आहे...ब्लॅकमेलिंग...

**नागेश :** ( एकदम आंत येत ) ब्लॅकमेलिंग ! अलबत ! ऊर्मिला, सांग ना श्रीनिवासला मी तुझ्याकडून पैसे कां, काढतों तें. का मी सांगूं ?

**ऊर्मिला :** ( विलक्षण घाईनें ) शट् अप !

[ नागेश ‘ अच्छा ’ म्हणून गप्प होतो. ]

**श्रीनिवास :** ( थोड्याशा रागानें ) नागेश, अरे कांहीं शिष्टाचार...

**नागेश :** शिष्टाचार ! मॅनर्स ! सभ्यता ! ! ( ओहो ! ) ( तुच्छतेनें खांदे उडवतो. ) इतका कांहीं असभ्य बनलों नाहीं मी अजून. लोटलेल्या दारावर टॅप केल्याखेरीज तं उघडूं नये हें मलाही कळतं, पण आपण खुशाल दारं उघडीं ठेवायचीं आणि तुम्ही पहातांय् असं म्हणत दुसऱ्याला असभ्य म्हणायचं, हा सभ्यपणा मात्र मला समजत नाहीं खरा.

**ऊर्मिला :** ( एकदम उठून ) नागेश, कां आलांत तुम्ही या घरांत ? हा दरवाजा तुम्हांला बंद आहे.

**नागेश :** म्हणून उघडा ठेवला होतात होय ?

**ऊर्मिला :** यू रास्कल् ! ( विलक्षण चिडते. )

**श्रीनिवास :** ( इतका वेळ कांहींसा दूर असलेला पुढें होऊन ) ऊर्मिला, तूं आंत जा बरं. ( ऊर्मिला जाते. ) सिनेमाला जाणार होतों आम्ही आज !

**नागेश :** नाटकावर पडदे पडले की पडद्यावर नाटकें सुरू होतात तीं अशीं !

**श्रीनिवास :** पुरे रे ! फार नाटकी बोलतोस तूं ! ( नागेशची नक्कल करीत ) शब्दाच्या कसरतीवर बुद्धीची सर्कस खेळणं चांगलं नाहीं. ( जरा वेळानें ) या ऊर्मिलाला आपण काय बोलतों हेंच कळत नाहीं, अगदीं भांबावली आहे बिचारी !

**नागेश :** खरंच ! काय गमती आहेत पहा, आंधळीं बिचारीं आंधळीं म्हणून ठेंचाळतात, निदान काठी बाळगतात. पण आंधळी कोशिंबीर खेळणारीं डोळस माणसं पडलीं कीं दुसऱ्यानं माझे डोळे बांधले म्हणून रडायला तयार...

**श्रीनिवास :** ( बऱ्याच वेळानें ) बरं झालं तूं इथं आलास.

**नागेश :** हो, मघाशीं तूं पास झाल्याचं कळलं, म्हटलं अभिनंदन करावं. ( शेकहॅन्ड करतो. )

**श्रीनिवास :** नाहींतर मीच येणार होतों तुझ्याकडे.

**नागेश :** कां रे बाबा ? एक एक पेशन्ट पक्का करायला लागलास का काय ?

**श्रीनिवास :** ( नाइलाजानें...उघडपणें ) नागेश, आत्तांच ऊर्मिलानं सारं कांहीं मला सांगितलं.

**नागेश :** खरं आहे. विश्वास आहे ना तुझा तिच्यावर ? ( त्याची नजर टाळतो. )

**श्रीनिवास :** क्षमा कर नागेश, वास्तविक यांत मला पडण्याचं कांहींच कारण नव्हतं. पण आज ऊर्मिला असहाय आहे. तूं झिडकारल्यानें दीनवाणी झाली आहे. आतां तूं ही टाळाटाळी कां चालवली आहेस ?

**नागेश :** कशाची टाळाटाळी ?

**श्रीनिवास :** स्पष्टच बोलतों. आतां ऊर्मिलाशीं लग्न करण्याचं कां नाकारतोस तूं ? तुम्हीं एकमेकांला आणा-शपथा दिल्यात नि आतां कां ? जरा विचार कर. ऊर्मिलाची ही अवस्था दाजीसाहेबांना कळली, चार लोकांत या गोष्टीचा बोभाटा झाला, तर किती वाईट परिणाम होईल याचा विचार कर. एका स्त्रीची बेइज्जत होईल. ज्या माणसानं आपलं सारं आयुष्य देशसेवेंत घालवलं ( मध्येंच नागेश देशसेवा ! असं उद्गारतो. हंसतो. ) ते दाजीसाहेब

आज मंत्री आहेत. त्यांची दानत, इभ्रत, मोठेपण मातीमोल होईल! ज्या समाजानें त्यांना आपला प्रतिनिधि निवडलं तो क्षणांत त्यांना खालीं ओढील! केवळ तुझ्या हेकेखोरपणानें...तुझ्या हेकेखोरपणानें...

**नागेश :** अहं! त्यांच्या मुलीच्या मूर्खपणामुळें.

**श्रीनिवास :** विकारांच्या आहारीं जाणं हा मूर्खपणा असेल तर तो तूंही केला आहेस! ( जरा वेळानें ) शिवाय दाजीसाहेबांच्या मुलीशीं लग्न करण्यांत तुझा फायदाच आहे.

**नागेश :** जरूर! केवढा तरी फायदा! एक मूर्ख, रडकी मुलगी बायको म्हणून जन्माची गळ्यांत पडणार! ( जरा वेळानें ) श्रीनिवास, दाजीसाहेबांची काय इच्छा आहे हें तुला माहीत आहे? चार लोकांच्या कुजबुजीची तूं मला भीति दाखवतोस—त्यांची काय समजूत आहे हें ठाऊक आहे तुला? दाजीसाहेबांनीं आपल्या मित्राच्या मुलाला सांभाळला, शिकवला. त्याच्या दवाखान्याची पाटी रंगायची ती दाजीसाहेबांच्या पैशानं. हें काय सारं आश्रिताला मदत म्हणून होय? ( जरा वेळानें ) श्रीनिवास, तुझं अलकावर प्रेम आहे म्हणे!... ऊर्मिलानंच सांगितलं मला. पण मी तर म्हणतों कीं, तूं अलकाला फसवतो आहेस.

**श्रीनिवास :** नागेश, तुला त्यांत बोलण्याचं कांहींच कारण नाहीं.

**नागेश :** कबूल! पण काय रे, दाजीसाहेबांना माहीत आहे तुमचं प्रेम-प्रकरण? तें मिनिस्टरीचें लोढणं गळ्यांत पडल्यापासून वेळ कुठाय त्यांना घरचं पहायला. ( थोड्या वेळानें ) पण श्रीनिवास, ते मात्र तुझ्या नि ऊर्मिलाच्या लग्नाचे इमले हवेंत बांधताहेत. उगीच नाहीं रचले हे उपकाराचे डोंगर तुझ्या डोक्यावर! मुंग्यांना साखर घालणारासुद्धां चित्रगुप्ताच्या रोजमेळा-कडे दृष्टि ठेवतो.

**श्रीनिवास :** ( विचार करून ) पण नागेश, मी अलकावर प्रेम करतों, तुझं ऊर्मिलेवर प्रेम आहे हें जर आपण त्यांना सांगितलं तर—

**नागेश :** तुला नि मला दोघांनाहि संपत्तीला तरी मुकावं लागेल, नाहीं तर प्रेमाला. श्रीनिवास, हीं मोठीं माणसं जितकीं मायाळू तितकींच मोठीं हेकट.

असतात. स्वतःच्या इच्छेला तीं दैवत मानतात. दाजीसाहेब ही गोष्ट कधींही कबूल करणार नाहींत.

**श्रीनिवास :** ( बऱ्याच वेळानें ) पण नागेश, तुझं नि ऊर्मिलाचं लग्न तर झालंच पाहिजे. (एकदम ) मी तर म्हणतों, दाजीसाहेबांच्या नकळत...गुपचुप लग्न करून घेऊं....मागाहून तर ते कांहीं करूं शकत नाहींत ?

**नागेश :** छेः ! तसं करणं म्हणजे नसती घोरपड गळ्यांत पाडून घेणं होईल ! त्यांच्या इस्टेटीची एक कपर्दिकही मिळणार नाहीं मला.

**श्रीनिवास :** नागेश, प्रेमाचं मोल का पैशांनीं मोजायचं ? प्रेमासाठीं संपत्तीचा त्याग करणं—

**नागेश :** हें वाटतं तेवढं सोपं नाहीं. तो व्यवहार आंतबट्ट्याचा होईल, तो जुगार आपल्याला परवडणार नाहीं. तें सवत्स धेनूचं दान फार महागांत पडेल ! प्रेमाचीं गाणीं गाणारा मी शाहीर नाहीं. जीवनाची वाटचाल करणारा एक मामुली माणूस आहें मी. हें प्रेमाचं आडवळण फार दूर पडेल मला.

**श्रीनिवास :** ( चिडून ) नागेश, ऊर्मिलाशीं लग्न करणं तुला भाग पडेल ...

**नागेश :** शक्य नाहीं. जीवनाच्या शाळेंत नफा-तोट्याच्या उदाहरणाला मार्क जास्त मिळतात. श्री, अरे, याच रडकथा ऊर्मिलेच्या तोंडून ऐकून ऐकून कान किटलेत माझे ! (जरा वेळानें) श्रीनिवास, खरं सांगूं ? मला दाजीसाहेबांचा पैसा हवा आहे. त्यासाठींच मीं ऊर्मिलाला फसवली असं समज वाटलं तर. माननीय दाजीसाहेबांची मुलगी भीक मागत होती आणि मी तिच्याच मुठींतून पैसे काढीत होतों. कां तें सांगूं तुला ? ( श्रीनिवास कांहींच बोलत नाहीं ) मी तिला सांगत होतों, दाजीसाहेब जर आपल्या इस्टेटीचो पै अन् पै माझ्या नांवावर करून देणार असतील तर ऊर्मिलाच्या आणि श्रीनिवासच्या अनैतिक संबंधावर पांघरूण घालण्यासाठीं ( श्रीनिवास 'नागेश' असें ओरडतो. ) हो, नागेश ! हा नागेश ऊर्मिलाशीं लग्न करायला तयार आहें. ( श्रीनिवास बेभान होतो. ) त्याचा परिणाम असा झाला कीं, मीं तुझं नांव गोवूं नये म्हणून ऊर्मिला मला पैसे द्यायला लागली. मी घेऊं लागलों.

**श्रीनिवास :** खोटं...साफ खोटं आहे तें.

**नागेश :** पण चार लोकांचा विश्वास हवा ना बसायला यावर. आज तूं या घरांत राहातोस, त्या मुलीबरोबर हिंडतोस, फिरतोस अन् हें उघड्या डोळ्यांनी पहाणारे लोक काय मूर्ख आहेत यावर विश्वास न ठेवायला ? उद्या लोक ऊर्मिलाबद्दल नाहीं नाहीं तें, ( खांकरून ) खरं तें बोलूं लागले, म्हणजे लोकांची वांकुल्या दाखवणारी नजर तुझ्यावरून फिरेल. बायाबापड्या तुझ्या नांवानं कानशिलावर बोटं मोडतील नि म्हणतील काय दुनिया आहे पहा, ज्याला पोसला त्यानंच पोशिंद्याच्या मुलीला फसवलं, तिचा केसानं गळा कापला !

**श्रीनिवास :** पण माझं नांव कां म्हणून निष्कारण बदनाम करतोस तूं ?

**नागेश :** निंदेची घोंग इतक्या सफाईदारपणें तुझ्या अंगावर फेंकून मला सुटतां येत असतांना मीं जर फायदा घेतला नाहीं तर तो वेडेपणाच होईल. ( जरा वेळानें ) श्रीनिवास, कल्पना कर, ऊर्मिलाची ही अवस्था उद्यां अलकाला समजली तर...तर तिला काय वाटेल आपल्या श्रीनिवासबद्दल ?

**श्रीनिवास :** ( ओरडून ) नागेश ! ( एकदम दूर होत ) जा, प्लीज नागेश. जा तूं इथून माझ्या नजरेसमोरून !

**नागेश :** ओ. के. अच्छा ! ! गुडबाय ! ( जातो. )

[ दिवाणखान्यांत श्रीनिवास एकटाच । सुन्नपणानें विमनस्क मनःस्थितींत बसलेला असतो. अशा वेळीं भाऊकाका बाहेरून आंत येतात. ]

**भाऊकाका :** अरेच्या ! अजून घरींच आहांत वाटतं तुम्ही ? अलका आली नाहीं अजून ? अगदींच वेंधळी आहे. वेळेचंसुद्धां भान नाहीं तिला.

**श्रीनिवास :** ( भाऊकाकांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ) भाऊ, तुम्ही मघाशीं म्हणालांत स्त्रीवर प्रेम करणं सोपं आहे, पण प्रेमाचं नाटक करणं फार कठीण. कां वाटतं तुम्हांला असं ?

**भाऊकाका :** मला आपलं वाटतं झालं, कां तें कसं सांगूं ? मला कांहीं अनुभव नाहीं त्या गोष्टीचा ! त्यांत मी काय बोलणार ! ( हंसतात. ) अरे, पण तुमच्या प्रोग्रॅमचं काय झालं ?

**श्रीनिवास :** ( अस्वस्थपणें ) भाऊ !

**भाऊकाका :** श्रीनिवास, अहो एवढं अस्वस्थ व्हायला काय झालं ? इतक्यांत येईल अलका नि अजून तसा कांहीं उशीर नाहीं झाला. बाकी प्रेमिकांचं हें असं असतं ! विरहाचे क्षण प्रहराच्या प्रवाहानें रेंगाळतात आणि मीलनाचे प्रहर चुटकीच्या तालावर, क्षणाच्या वेगानें पळूं लागतात.

**श्रीनिवास :** भाऊ, या वयांत इतकं प्रेमाला आळवणं बरं नाहीं. ( एकदम ) क्षमा करा भाऊ, पण थट्टा नको, मी त्या मनःस्थितींत नाहीं.

**भाऊकाका :** अरेच्या ! खरंच, फार अस्वस्थ दिसतां तुम्ही ! अहो, मी म्हातारा माणूस हो काय थट्टा करणार तुमची ? स्त्रीप्रमाणं थट्टादेखील तरुणांनाच वश असते श्रीनिवास. ( ह्याच वेळीं ऊर्मिला आंतल्या खोलींतून बाहेर येऊन दाराशीं उभी रहाते. ) उर्मिला, तूं पण घरींच आहेस होय ? म्हणजे अलकाच तेवढी यायची राहिली म्हणायची !

**श्रीनिवास :** हो, अलकाच तेवढी यायची राहिली आहे. अन् ती आली कीं भाऊ, माझा तिला एक निरोप सांगा. म्हणावं, श्रीनिवास तुझ्याबरोबर सिनेमाला येणार नाहीं. ( पाठ फिरवून ) यापुढें नेहमीं तिला श्रीनिवासला सोडूनच जावं लागेल.

**भाऊकाका :** ( दचकून ) श्रीनिवास, काय समजायचा याचा अर्थ ?

**ऊर्मिला :** ( एकदम पुढें होऊन ) भाऊ, अलका आली नि तुम्हांला भेटली तर तिला म्हणावं, श्रीनिवास तुझी वाट पहातो आहे. ( भाऊकाका थोडेसे घुटमळतात आणि जातात. ऊर्मिला श्रीनिवासच्या जवळ जाते. ) श्रीनिवास, फार वाईट वागलास तूं भाऊकाकांशीं ! पोटच्या मुलासारखी माया करतात ते आपल्यावर.

**श्रीनिवास :** ( सुस्कारा सोडून ) खरंच ! चूक झाली माझी ! भानच नाहीं राहिलं. अगदीं गोंधळ उडाला माझा...

**ऊर्मिला :** ( दूर होत ) गेला वाटतं नागेश ? ( श्रीनिवास हं म्हणतो ) काय म्हणाला तो ?

**श्रीनिवास :** काय म्हणणार ? जिथें तुझे अश्रु त्याचं फत्तराचं काळीज धुऊं शकले नाहींत, तिथें माझ्या शब्दांना काय किंमत देणार तो. फारच भयंकर कारस्थान रचलं आहे त्यानं. ( नाइलाजानें ) तुला दमदाट्या देऊन

तो कसे पैसे उकळीत होता तें सांगितलं त्यानं मला. तुझा नि माझा अमंगल संबंध जोडून—

**ऊर्मिला :** ( एकदम पुढें होऊन त्याच्या तोंडावर हात ठेवते. ) पुरे, सारं समजलं. नीच...स्वार्थी...कपटी...बदमाष...

**श्रीनिवास :** हेंच—ऊर्मिला, उद्या त्यानं सारं खोटंनाटं पसरवण्यास सुरुवात केली म्हणजे सारेजण उद्यां मला अगदीं हेंच म्हणतील. नीच नि स्वार्थी! कपटी नि बदमाष ! एका स्त्रीच्या शीलाची विटंबना, एका लोकनेत्याच्या प्रतिष्ठेला धक्का, सारं माझ्यामुळें—

**ऊर्मिला :** पण मी साऱ्यांना सांगेन—

**श्रीनिवास :** त्याचा काय उपयोग होणार ऊर्मिला? फसलेल्या स्त्रीच्या शब्दालादेखील लोक फसवणूकच समजतात. कोण विश्वास ठेवणार ?

**ऊर्मिला :** ( बऱ्याच वेळानें ) अस्सं ! तर मग...

**श्रीनिवास :** ( घाबरून ) छेः छेः ! ऊर्मिला, तसं करणं निव्वळ वेडेपणाचं ठरेल हं !

**ऊर्मिला :** पण श्री, मंत्रानं विष उतरत नाहीं...

**श्रीनिवास :** तरी माणूस कुणी नाहीं मरूं देत ! विष उतरण्यासाठीं कोंबडी लावतात. तें विष कोंबडी घेते, मरते नि माणूस जगतो. ( थोड्या वेळानें ) यावर दुसराहि कांहीं उपाय आहे.

**ऊर्मिला :** श्रीनिवास, ( भीतीनें ) निरपराधी जिवाचा नाश, हा उपाय सुचवणार आहेस तूं मी जगण्यासाठीं ? दाजीसाहेबांची प्रतिष्ठा नि माझं भ्रष्ट शील लपवण्यासाठीं ?

**श्रीनिवास :** ( तिच्याजवळ जाऊन ) ऊर्मिला, असं कसं सांगेन मी तुला ! ( बऱ्याच वेळानें ) सर्व विचार करून मीं ठरवलं आहे... ( तिचा हात हातात घेऊन एकदम ) ऊर्मिला, मी तुझ्याशीं लग्न करणार आहें. ( ऊर्मिला दचकते... एकदम दूर होते. ) तुझ्या निरपराधी बाळाचा मी पिता होणार आहें.

**ऊर्मिला :** ( एकदम ) श्रीनिवास ! ( दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेत ) नाहीं, नाहीं ! ( एकदम वर पाहून ) छे छे तें शक्य नाहीं. निव्वळ वेडेपणा होईल तो.

**श्रीनिवास :** ( पुन्हां ऊर्मिलाच्या जवळ जात ) नीतीच्या कल्पनांनीं वेड्या बनलेल्या समाजाच्या समाधानासाठीं तेवढाच एक शहाणपणाचा मार्ग आहे. ( अतिशय विवशतेनें ) ऊर्मिला, देवा-ब्राह्मणांसमक्ष लाजा-होमांत अलकावरील प्रेमाची आहुति देऊन सप्तपदीच्या पावलांबरोबर अलकापासून दूर दूर जात मी तुझा पति...नव्हे तुझ्या बाळाचा पिता होणार आहें ऊर्मिला !

**ऊर्मिला :** ( आवेगानें ) नकोरे ! ( जरा वेळानें ) मी तुला असला आततायीपणा करूं देणार नाहीं. तुमच्या विदग्ध प्रेमाचीं लक्तरें व्हावींत नि मीं नीतीच्या शालींत जगावं...नाहीं, मी नाहीं कबूल होणार या गोष्टीला...

**श्रीनिवास :** पण ऊर्मिला, साऱ्या गोष्टी किती सफाईदारपणें झांकतां येतील याची कल्पना आहे तुला ? ( जरा वेळानें ) मी सांगतों म्हणून नव्हे, पण दाजीसाहेबांची इच्छा म्हणून तुला माझ्याशींच लग्न करावं लागेल. ( एकदम बोलणें थांबवतो. आवेगानें तोंड फिरवतो. जरा वेळानें ) ऊर्मिला, मीं ठरवलं तसंच झालं पाहिजे.

**ऊर्मिला :** श्रीनिवास, माझं बरं व्हावं, दाजीसाहेबांची मानहानी टाळावी, म्हणून तूं सारं ठरवतोस. पण अलका, तिचं प्रेम, याचा विचार करीत नाहींस तूं !

**श्रीनिवास :** ऊर्मिला, तिचं माझ्यावर खरं प्रेम असेल तर ती मुळींच विरोध करणार नाहीं.

**ऊर्मिला :** श्रीनिवास, अलका ही एक स्त्री आहे.

**श्रीनिवास :** त्यागाचं मोल स्त्रीलाच जास्त कळतं. आपल्या मुलासाठीं सामाजिक विटंबना सहन करणारी स्त्री...

**ऊर्मिला :** आई म्हणून तें सहन करते. आपला प्रियकर दुसऱ्या स्त्रीशीं लग्न करतो ही कल्पनाच कुठलीहि स्त्री सहन करूं शकत नाहीं.

**श्रीनिवास :** पण ऊर्मिला, अलकाच्या नकाराचा मुळीं प्रश्नच नाहीं. प्रश्न आहे तो तुझ्या बाळाचा ! ( बोलणं संपवण्यासाठीं ). मी ऊर्मिलेशीं लग्न करणार आहें, असं मी आज दाजीसाहेबांना सांगणार आहें. हें लग्न होणार. झालंच पाहिजे. ( थोड्या वेळानें ) माझ्या अंतःकरणांतलं अलकाचं स्थान

अढळ असलं तरी समाजाच्या बाजारांत ऊर्मिला, तूं, फक्त तूंच, माझी म्हणून ओळखली जाशील.

**ऊर्मिला** : छे ! आतां मात्र हें सारं माझ्या सहनशीलतेच्या पलीकडचं आहे.

[ इतक्यांत बाहेरून येणाऱ्या अलकाची श्रीनिवास...अशी हांक ऐकूं येते. क्षणभर दोघेंहि दचकतात. मग श्रीनिवासचा चेहरा निश्चयी होतो. ]

**अलका** : चांगलाच उशीर झाला नाहीं मला ! सॉरी हं ! या शैलाचं हें असंच असतं. फाजील कुठली ! म्हणे कोण पास झालं तें नांव उखाणा घेऊन सांग ! ( तरीहीं तो गप्पच बसलेला पाहून ) ए डॉक्टर, असा गप्प कां रे तूं ? ( तरीही तो गप्पच ) ए हे...काय ऐट आणली आहे पण ! अगदीं मारीच आहे तुझं नाहीं तरी. ( ऊर्मिलाला पहाते. ) ऊर्मिला, कुठें गेली होतीस मघाशीं एवढ्या उन्हाची ?

**ऊर्मिला** : ( उद्वेगानें ) विचारांना थंडपणा यावा म्हणून बाहेर गेलें होतें.

**अलका** : ए तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थिनी, पुरे बाई तुझं तें गंभीर बोलणं ( घड्याळांत पहात ) निघायचं ना श्री ?

**श्रीनिवास** : अलका, सिनेमाचा बेत कॅन्सल केला आहे.

**अलका** : जा बाई, तुझं असंच असतं ! आपण ठरवायचं नि आपणच मोडायचं !

**श्रीनिवास** : पण तूं जा की...

**अलका** : ए हे...( वेडावून ) वाटतंय् का कांहीं ! म्हणे तूं जा कीं ! ! ( जरा वेळानें ) बरं बाबा, कॅन्सल तर कॅन्सल. मग फिरायला येतोस ? जाऊं या का ऊर्मिला ? ( स्वप्नाळूपणानें ) कार घ्यावी नि खूप वेगानें सोडावी... ती वाऱ्याच्याही पुढें धावेल एवढ्या वेगानें ! साऱ्या गलबल्यापासून दूर व्हावं, लांब लांब जावं. स्वतांच्या लांब लांब सावल्या निरखाव्यात. सागराच्या फेसाळणाऱ्या लाटेकडे पहात उन्मादाचे फेस उसळावेत ! पदर उडवणाऱ्या अवखळ वायुलहरींवर खोटं रागवावं, ढगांच्या ढिगाऱ्यांना वेडावावं, मिटणाऱ्या पिसाऱ्यासारखा सूर्यास्त पहावा, असं कांहीं तरी अद्भुत,

अद्भुत करावंसं वाटतंय् मला ( एकदम ) नि तुम्ही बसलांत इथंच ; जाऊं या का !

**श्रीनिवास :** बाहेर जावंसंसुद्धां वाटत नाहीं मला.

**अलका :** झालंय् तरी काय आज तुला ? ( दोघांकडे आळीपाळीनें पहात ) श्री, ऊर्मिला, भांडणं झालीं वाटतं तुमचीं ? ( ती श्रीनिवासजवळ जाते. तो दूर होतो. ) वेड्यासारखं बडबडायचं, खुळ्यासारखं नाचायचं, लहान मुलासारख्या गाड्या गाड्या भिंगोऱ्या खेळायच्या, तें हें......

**श्रीनिवास :** उगीच काय बडबड चालवली आहेस तूं अलका मघांपासून...

**अलका :** ( त्याच्या शब्दांतला तुटकपणा जाणवून ) अग्ग बाई ! म्हणजे बोलायचंसुद्धां नाहीं होय ? मग काय नुसतं पहात बसायचं एकमेकांकडे ? ( त्याच्याजवळ जाते. त्याचा हात धरते. दचकून ) किती अंग तापलंय् रे तुझं ? ऊर्मिला, पाहिलंस याचे डोळे तरी किती लाल झाले आहेत ते...

[ इतका वेळ अलकाचें श्रीनिवासबद्दल निस्सीम प्रेम दाखविणारं बोलणं, त्या भावना पाहून ऊर्मिलाचा मनावरचा ताबा सुटतो. तिला हुंदका अनावर होतो. नि 'अलका' एवढाच ! उद्गार काढून ती आंत जाते. अलका अगदीं भांबावून जाते, श्रीनिवासकडे पाहते. ]

**श्रीनिवास :** ( अलकाची नजर चुकवीत ) अलका, उगीच कां ऊर्मिलाच्या हृदयाला वेदना देते आहेस तूं ?

**अलका :** ( जास्तच गोंधळून ) कोण मी ?

[ श्रीनिवासला काय बोलावं हें कळत नाहीं. भाऊकाका बाहेरून येतात. ]

**भाऊकाका :** अजून आली नाहींना ही अलका ! ( तेवढ्यांत अलकाला पहातात ) उशिरां आलीस वाटतं ! मग आतां घरींच जेवणार असाल तुम्ही ! मघांशींच मीं आचाऱ्याला सांगितलं कीं, तुम्ही सारे बाहेर जेवणार ! आतां पुन्हां त्याला सांगायला हवं. ( आंत जाऊं लागतात. )

**श्रीनिवास :** भाऊ , ( भाऊकाका थांबतात. ) भाऊकाका, अलकाला म्हणावं, दाजीसाहेबांची इच्छा म्हणून श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करणार आहे. ( अलकाकडे अगर भाऊकाकांकडे कुठेंच पहात नाहीं. )

**भाऊकाका :** ( गोंधळून ) श्रीनिवास ...मीं......मीं......

**श्रीनिवास :** ( तीव्रतेनें ) नाहीं कळला मीं सांगितलेला निरोप ?

**अलका :** ( एकदम त्वेषानें ) असा आहे होय या वागण्याचा अर्थ ? ठीक. भाऊ, प्रेम, एकनिष्ठा सारं सारं लाथाडून, दाजीसाहेबांची इच्छा म्हणून श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करणार आहे. ( चिडून ) भेकड ! दुबळा ! ( जरा वेळानें ) ठीक आहे. भाऊकाका, श्रीनिवासला म्हणावं अलकाला निरोप समजला.

**श्रीनिवास :** भाऊकाका, उत्तर मिळालं ! आतां जाऊं शकतां तुम्ही.

[ भाऊकाकांना कांहींच कळत नाहीं. गोंधळलेल्या मनःस्थितींत जिना चढून वर जातात. मग एकदम अलका श्रीनिवासजवळ जाते. ]

**अलका :** श्री, खरं आहे हें सारं ?

**श्रीनिवास :** आतांपर्यंत श्रीनिवास अलकाशीं कधींच खोटं बोलला नाहीं.

**अलका :** ( दूर होत ) फक्त आपलं तिच्यावर प्रेम आहे एवढाच खोटेपणा केला त्यानं. ( जरा वेळानें जवळ येत ) तूं ऊर्मिलाशीं लग्न करणार आहेस ? प्रेम आहे तुझं तिच्यावर ?

**श्रीनिवास :** लग्नाच्या बाबतींत प्रेमापेक्षां इच्छेला नि फायद्याला व्यवहारी जग अधिक किंमत देतं.

**अलका :** नाहीं ! ( वैतागानं ) तुझं माझ्यावर प्रेम नव्हतं. नाटकच होतं तें.

**श्रीनिवास :** ( त्राग्यानें उत्तर न सुचून ) कांहीं म्हण ! प्रेमाचं नाटक म्हण, नाटकांतलं प्रेम म्हण !

**अलका :** ( आवर्जून ) पण आपलीं नवीं नातीं...

**श्रीनिवास :** ( तुटकपणें ) जिथं माणूस रक्ताचीं नातीं विसरतो तिथं जोडलेल्या नात्यांची...

**अलका :** पुरे, ( चिडून ) तूं मला फसवीत होतास. तुझी दृष्टि दाजीसाहेबांच्या पैशावर, संपत्तीवर आहे ! तुला ऐश्वर्याला कवटाळायचं आहे. मीं तुझ्यावर प्रेम केलं, ( हताशपणें ) मूर्खपणाच केला.

**श्रीनिवास :** मूर्खपणाची जाणीव होणं हें शहाणपणाचं लक्षण आहे. अलका, तुझं नि माझं प्रेम हें स्वप्न होतं ! माझं नि ऊर्मिलाचं लग्न हें सत्य आहे. सत्याच्या मनोऱ्यांना स्वप्नांच्या धुक्यानं झाकूं नकोस ! श्रीनिवास ऊर्मिलाचा पति आहे, ती त्याची वाग्दत्त वधू आहे.

**अलका :** ( बेभानपणें ) स्वार्थी, नीच, कपटी, बदमाष...

**श्रीनिवास :** ( तुटकपणें ) जगांत शब्दांच्या सधनतेपेक्षां सधनांच्या शब्दाला जास्त किंमत आहे अलका. ( एकदम बाहेर निघून जातो. )

**अलका :** ( भावनातिशयानें ) श्री...श्रीनिवास ! ( अगतिकपणें ) भाऊ, भाऊ, ऐकलंत, श्रीनिवास काय म्हणाला तें ? शब्दांच्या सधनतेपेक्षां सधनाच्या शब्दाला जास्त किंमत ! प्रेमापेक्षां पैशाचं मोल जास्त ! पाहिलंत ना किती नीच आहे श्रीनिवास तें. ( मान खालीं टाकते. स्फुंदूं लागते. )

**भाऊकाका :** ( झपझप जिना उतरून अलकाजवळ जात. ) अलका ! बेटा अलका...!

**अलका :** भाऊ... ( भाऊकाका ममतेनें तिच्या अंगावर हात फिरवितात. त्याच वेळीं ऊर्मिला आंतल्या खोलींतून बाहेर येते. तिला पाहून त्वेषानें ) तूं...तूंच याला कारण आहेस. तुझ्यामुळें...

**भाऊकाका :** ( मोठ्या मुष्किलीनें तिला सांवरीत ) अलका...बेटा, माझं ऐक.

[ असहाय्यपणें अलका रडूं लागते, ऊर्मिला खोलींत जाण्यासाठीं वळते तोंच हलके हलके पडदा पडतो. ]

---

# अंक दुसरा

[ ना. दाजीसाहेबांच्या दिवाणखान्याची जागा. वेळ पहिल्या अंका-नंतर कांहीं दिवसांनीं. कालमानाप्रमाणें मांडणींत जेवढा फरक पडणें शक्य आहे, तेवढाच दृष्टीस पडतो. चटकन् लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणजे श्रीनिवासचा फोटो एका ठळक ठिकाणीं लावलेला आहे. पडदा उघडतो.

दाजीसाहेब पुढें आणि भाऊकाका मागें असे बोलत बोलत जिन्या-वरून येतात. ]

**दाजीसाहेब :** भाऊ, तेव्हां आतां मीं हें सारं असं ठरवलं आहे. तुम्ही आम्हांला घरच्यासारखे म्हणून विचारतों, बरोबर आहे ना मीं ठरवलं तें ?

**भाऊकाका :** मालक, हें काय बोलणं झालं ! नांवाजलेले कायदेपंडित, लोकप्रिय पुढारी आणि प्रान्ताचे मंत्री आपण, माझ्यासारखा मामुली माणूस काय सल्ला देणार आपल्यासारख्यांना !

**दाजीसाहेब :** भाऊ, कायद्याच्या बाजूनं म्हणत नाहीं मी. प्रश्न आहे तो भावनेचा. या मंत्रिपदाचं लोढणं गळ्यांत पडल्यापासून आम्हांला मुळीं घरचं पहायला फुरसतच नाहीं हें एक आणि शिवाय ऊर्मिला काय, अलका काय, आणि श्रीनिवास झाला तरी काय, सगळ्यांचाच तुमच्यावर विश्वास. म्हणून विचारतों—मीं जें योजलेलं आहे त्यामुळें नाराज तर होणार नाहीं ना कुणी ?

**भाऊकाका :** नाराज ? मी नाहीं समजलों आपल्या बोलण्याचा अर्थ.

**दाजीसाहेब :** नाराज म्हणजे तसं नाराज नाहीं म्हणत मी. पण... ( जरासें थांबून ) दोन दिवसांपूर्वी श्रीनिवासचं पत्र मिळालं, त्यानं ऊर्मिलाला मागणी घातली—झालं तें एका अर्थी बरंच झालं. मीं विचारण्यापूर्वीच त्यानं आपली इच्छा व्यक्त केली. वास्तविक घरांतल्या घरांत पत्र लिहिण्याची तरी काय जरूर होती ?

**भाऊकाका :** आतां हें पहा, कांहीं कांहीं वेळां उघड बोलण्यापेक्षां असं पत्रानंच विचारणं बरं वाटतं माणसाला. भीति वाटली असेल, लाजला असेल !

**दाजीसाहेब :** भीति ? माझी भीति ? आतां तो आमचा जांवई होणार असला तरी सांगतों भाऊ, हा श्रीनिवास कधीं कधीं अगदीं पोरासारखा वागतो. या मुलांना आपण मोठीं झालीं आहोंत हें केव्हां कळणार आहे कुणास ठाऊक ! बरं, पण मी काय सांगत होतों. हं, तेव्हां मीं ठरवलं आहे कीं, हें कार्य उरकण्यापूर्वी आमच्या इस्टेटीची योग्य ती व्यवस्था करावी. माझ्या या वुइलमध्यें मीं माझी मिळकत ऊर्मिला नि श्रीनिवास यांच्या नांवानं केली आणि त्यांतच त्यांच्याकडून अलकाला दरमहा निर्वेध तीनशें रुपये मिळत जावे असं जें लिहिलं तें कितपत बरोबर ठरेल ? कां जें काय द्यायचं तें अलकाला आत्तांच वेगळं द्यावं. काय करावं हा निर्णय कांहीं पक्का ठरत नाहीं. (जरा वेळानें) तुम्हांला काय वाटतं भाऊ ?

**भाऊकाका :** मला वाटतं कीं, याबद्दल अलकालाच काय तें स्पष्टपणें विचारावं.

**दाजीसाहेब :** तिला काय विचारायचं आहे यांत ? अजून जिच्या अंगांतला हूडपणा गेला नाहीं त्या मुलीला यांत काय समजतंय् ?

**भाऊकाका :** खरं आहे आपण म्हणतां तें ! पण मालक...(जरा घुटमळतात)

**दाजीसाहेब :** बोला, बोला भाऊ, त्यांत कसला आला आहे संकोच !

**भाऊकाका :** संकोच नाहीं. पण—

**दाजीसाहेब :** पण काय ?

**भाऊकाका :** थोडंसं चमत्कारिक आहे. श्रीनिवासचं आणि ऊर्मिलाचं लग्न ठरल्यापासून घरांतलं सारं वातावरण पार बदलून गेलं आहे.

**दाजीसाहेब :** (आश्चर्यानें) असं म्हणतां ? आमच्या लक्षांतच नाहीं आलं. प्रांताचा संसार पाहतांना संसाराच्या प्रांताकडे दुर्लक्षच होतंय् आमच्याकडून. (जरा विचार करून) भाऊ, अलका बोलली कांहीं तुमच्याजवळ ?

**भाऊकाका :** नाहीं. तसं बोलली नाहीं. पण तिचं मन या घरांत रमत नाहीं. आतां आपण इथं राहूंच नये असं घेतलं आहे तिच्या मनानं.

**दाजीसाहेब :** ( आश्चर्यानें ) काय, सांगतां काय हें भाऊ ! ( जरा वेळानें ) असं आहे होय सारं ! ( एकदम ) पण भाऊ, मी असतांनासुद्धां तिला असं वाटतं ?

**भाऊकाका :** मालक, उद्यां श्रीनिवास आणि ऊर्मिलाचं लग्न झालं कीं हें घर त्यांचं होणार.

**दाजीसाहेब :** हो. म्हणजे या जबाबदारींतून आम्ही मुक्त होणार ! म्हणून तर श्रीनिवासचा हा फोटो मीं मुद्दाम इथं लावला. ( श्रीनिवासच्या फोटो-कडे पाहतात. ) तुम्ही म्हणालांत तेंच खरं ! मी विचारीन अलकाला स्पष्टपणें...( जरा वेळानें ) घरांतलं वातावरणच बदललं आहे हं ! खरंच ! श्रीनिवाससुद्धां पूर्वीसारखा मोकळेपणानं वागत नाहीं घरात.

**भाऊकाका :** तो मुळीं घरांत नसतोच ! सदा दवाखाना नि आपण. स्टेथास्कोप नि बाटल्या या जमवाजमवींत गुरफटून गेला आहे अगदीं !

**दाजीसाहेब :** चांगलं लग्न ठरलं, पण तसलं वागणंसुद्धां नाहीं. अगदींच अरसिक आहे लेकाचा !

**भाऊकाका :** साहजिकच आहे. लग्नाची जबाबदारी आपल्यावर आहे, दवाखान्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. दवाखाना नवीन उघडायचा, प्रॅक्टिसचा जम बसवायचा, त्यांतच लक्ष घालायला हवं त्याला.

**दाजीसाहेब :** पण म्हणून काय बायकोपेक्षां बाटल्या जास्त आहेत ? भाऊ, आमचं लग्न झालं तेव्हां आमच्या वकिलीची पाटीसुद्धां नवीनच रंगवलेली होती. पण ठरलेल्या वेळेच्या पलीकडे पक्षकार येऊं देत...दरवाजा लोटलेला ! त्या काळचे दिवस, मोठीं माणसं, त्यांचा धाक, भीति, मान, सारे डोळ्यात तेल घालून दरडावीत असायचे !...पण आम्ही...जाऊं द्या झालं. या मुलांना मुळीं काव्यच समजत नाहीं ! अगदीं अरसिक...( दारावरची घंटा वाजते. ) कोण आलं आतां या वेळीं ?

[ भाऊकाका बाहेर जातात. जरा वेळानें व्हिजिटिंग कार्ड घेऊन येतात. ]

**भाऊकाका :** ' प्रजासत्ता ' दैनिकाचा बातमीदार दिसतोय.

**दाजीसाहेब :** वर्तमानपत्राचा बातमीदार ! या मुलाखतींनीं तर अगदीं मंडावलं आहे. पुन्हां चुकवायची सोय नाहीं. लोकनियुक्त मंत्री लोकप्रतिनिधि

नाहींत, राज्ययंत्राचे मिंधे आहेत, असं म्हणायला तयार ! बरं, घेतलेल्या मुलाखती तरी धड छापतील ? नांव नका काढूं. वाटेल तें छापतात नि खुलासा करताना आमच्या नाकीं नऊ येतात. भाऊ, त्याला म्हणावं ऊर्मिलेचे पपा घरीं आहेत, नामदार दाजीसाहेब घरीं नाहींत...सेक्रेटरीएटवर भेटतील ते. काय वाटेल तें सांगा पण वाटेला लावा. ( भाऊ जाऊं लागतात. ) पण थांबा भाऊ, असा का तो जाणार आहे ? नाहीं मुलाखत दिली तरी टीकेचे टांक खरडायचे, दिली तरी ओरडायचेच ते.

[ भाऊकाका जातात. भाऊकाका आणि त्यांचे मागोमाग बातमीदार प्रवेश करतात. पोशाख बातमीदाराचाच. नको तिथें हिः हिः नि हवं तिथंहि हिः हिः करून हंसायची नि वेळोवेळीं वांकून नमस्कार करण्याची वाईट खोड. ]

**बातमीदार :** ( नमस्कार करून ) नमस्ते. ( हंसतो. )

**दाजीसाहेब :** बसा.

**बातमीदार :** बसतोंना. ( हंसतो. )

**दाजीसाहेब :** भाऊ, विचारा त्यांना काय हवं आहे तें.

**बातमीदार :** मुलाखत, मुलाखतीसाठीं आलों होतों आम्ही.

**दाजीसाहेब :** आम्ही, काय हो तुम्ही, परवां सेक्रेटरीएटमध्यें चांगली अट्ठावन्न मिनिटें प्रेस कॉन्फरन्स घेतली मीं. तेव्हां कुठं होतां तुम्ही ? बाकी तुम्ही वर्तमानपत्रवाले म्हणजे मुलाखतीचे खड्डे खणायचे नि बातमीचे डोंगर रचायचे हेंच काम तुमचं ! ( बातमीदार हंसतो. ) हंसतां काय ?

**बातमीदार :** नाहीं म्हणजे आम्हांला आपली ती संवयच जडली आहे. ( हंसतो, हंसणें दाबतो. )

**भाऊकाका :** ( त्याला ऐकूं जाईल अशा बेतानें ) जिथें तिथें दांत पडायला लागले म्हणजे माणूस दांत काढतो तें हें असं. ( उघड ) परवां होतांत ना त्या मुलाखतीच्या वेळीं हजर ?

**बातमीदार :** होतों कीं, पण आजच्या मुलाखतीचा हेतूच वेगळा आहे.

**दाजीसाहेब :** म्हणजे ? आज काय नवीन भानगड निघाली आहे ?

**बातमीदार :** आमच्या दैनिकाच्या कोडेंक्रमांक ३६ चें बिनचूक बरोबर उत्तर पाठविणाऱ्या कुमारी अलका कर्णिक यांची मुलाखत हवी आहे आम्हांला.

**भाऊकाका :** म्हणजे नामदारांकडे आला नाहींत तर तुम्ही ?

**दाजीसाहेब :** कुमारी अलका कर्णिक ? अरे म्हणजे अलकाच कीं ! छे ! कांहीं तरी गैरसमज होतोय् तुमचा. अलका कशाला कोडं पाठवील ?

**बातमीदार :** एक वेळ आम्ही मजकूर चुकीचा छापतों, पण आमची समजूत मात्र पक्की झालेली असते. याच पत्त्यावर बक्षीस मिळालंय्. ( हंसतो. )

**दाजीसाहेब :** मी इकडे राजकारणांत गुंतत चाललोंय् नि ही अलका शब्दांची गुंतागुंत सोडवते आहे. आपण कशाला सोडवावींत असलीं कोडीं ?

**भाऊकाका :** ( आपल्याशींच ) इतर कोडीं सुटेनाशीं झालीं, कीं माणूस शब्दकोडीं सोडवितो. ( बातमीदाराला ) तुम्ही जरा थांबा हं ! मी पहातों कुमारी अलका कर्णिक आहेत का तें.

**दाजीसाहेब :** ( भाऊकाका आंत गेल्यावर ) काय बातमीदार, काय म्हणतोय् पेपर ?

**बातमीदार :** ठीक आहे, कोड्यांचं उत्पन्न येतंय्, त्यामुळं जोरांत आहे. पूर्वी जेमतेम तीन-चार हजारांचा सेल, तिथं हीं कोडीं सुरू झाल्यावर चाळीस हजार कॉपीज् पुऱ्या पडत नाहींत. ( हंसतो. )

**दाजीसाहेब :** चांगलं ! बऱ्याच वर्षांनीं ऊर्जितावस्था आली म्हणायची !

**भाऊकाका :** ( बाहेर येत ) माफ करा बातमीदारसाहेब, अलकाताई बाहेर गेल्या आहेत.

**बातमीदार :** बाहेर गेल्या ? ( आंबट तोंडानें ) साराच घोटाळा. मजकुराच्या अंदाजानं जागा सोडून मुलाखतीला आलों होतों. ( जरा वेळानें विचार करून काहीं कल्पना सुचून ) तरी हरकत नाहीं. ठरलेले तर प्रश्न. कुणाला तरी विचारायचे नि कांहीं तरी उत्तरं छापायचीं. जागा भरल्यास कारण !

**दाजीसाहेब :** छान ! चागला जर्नालिझम आहे हा ! ही राष्ट्राची चौथी दौलत मंत्र्यांच्या तेवढी पांचवीला पुजलेली आहे ! विकेटकीपर मंत्र्यांची

.लाखत मंत्र्यांच्या नांवावर नाहीं छापत, हें नशीब आमचं! (मुद्दाम चेष्टेनं) ाय प्रश्न आहेत तुमचे? नमुना तर पाहूं दे आम्हांला!

**ातमीदार** : ( हंसतो. खिशांतील खंडीभर कागद चाळून ) हें पहा, पहिला श्न कोड्याचं आपलं उत्तर बिनचूक बरोबर आलं कसं?

**ाऊकाका** : हा काय प्रश्न झाला! पाठविलेलं उत्तर नेहमींच बरोबर असतं. द्दा असा असतो कीं, तें तुमच्या उत्तराशीं कसं जमायचं. तें मात्र निव्वळ वाधीन आहे.

**ाजीसाहेब** : बरोबर आहे तुम्ही म्हणालां तें भाऊ.!

**ातमीदार** : पण मुलाखतीला हें उत्तर नाहीं चालायचं. निदान असलं त्तर छापायचं नसतं. आम्ही छापूं, (घसा साफ करून) ज्याप्रमाणें ासंगानं विद्या वाढते, उद्योगानं लक्ष्मी वश होते, त्याप्रमाणें सतत कोडीं ोडविण्यानं कोडीं बरोबर येतात. ( हंसतो.) तें घेतों म्हणा आम्ही जमवून. ातां दुसरा प्रश्न, आपण या पैशाचा विनियोग कसा करणार?

**ाजीसाहेब** : बरं का बातमीदार, पैसा खर्च कसा करायचा, याचा ाचार फक्त पैसा मिळेपर्यंतच माणूस करीत असतो.

**ाऊकाका** : एकदां पैसा मिळाला, कीं त्याच्या वजनानें खिशाला एवढं ोठं भोंक पडतं कीं, त्यांतून गळणारा पैसा वाचवावा कसा हीच विवंचना डते माणसाला.

[ भाऊकाका नि दाजीसाहेब हंसतात. बातमीदार पण हंसतो. ]

**ातमीदार** : हें तत्त्वज्ञान म्हणून ठीक आहे; पण आमचा सेल वाढावा, ोकांनीं कोडीं सोडवावीं, म्हणून आम्ही लिहितों. कोड्याचं बक्षीस ही ध्येय-ाद जिंकण्याची गुरुकिल्ली आहे. ( रंगांत येऊन ) जसा अल्लाउद्दीनला जादूचा ़वा, गरिबाला परीस किंवा जांवई कंपनीला कंत्राट, तसं आहे हें ोड्याचं बक्षीस!

**ाजीसाहेब** : ( रागानें ) बातमीदार, तुम्ही कुणासमोर बोलतां याची ाणीव आहे? म्हणे जांवई कंपनीला कंत्राट!

**ातमीदार** : ( हंसून वरमून ) माफ करा, चूक झाली आमची.

**दाजीसाहेब :** ही काय तुम्हांला चकाट्या पिटण्याची वर्तमानपत्राची कचेरी वाटली होय ? क्षणभर मोकळेपणानं बोललों तो असा उर्मट फायदा घेण्यासाठीं होय ? स्वतःच्या बुद्धीला तारतम्याचा लगाम घाला. डोकं वापरलंत तर वर्तमानपत्रं कांहीं बंद नाहीं पडायचीं. अकलेचे दिवे खिळे जुळवण्याकडे लावा—पोटाची खळगी भरेल.

**बातमीदार :** ( हंसतो.) नामदारसाहेब, प्रसरलं खरं आमचं बोलतां बोलतां. ही एवढी जीभ ताब्यांत असती तर बातमीदार कशाला झालों असतों ? जाहीर माफी मागतों.

**भाऊकाका :** हें पहा बातमीदार, तुम्ही जा बरं आतां. अलकाबाईंना भेटायचं असलं तर या पुन्हां केव्हां तरी. नाहींतर छापाना तुम्हांला हवी तशी मुलाखत. ( बातमीदार घुटमळतो. भाऊकाका त्याला जाण्याची खूण करतात. तो हंसतो, वांकून नमस्कार करतो नि मागें वळून पहात पहात जातो. दाजीसाहेबांना उद्देशून ) मालक, एवढं काय रागवायचं त्या क्षुल्लक माणसावर ?

**दाजीसाहेब :** वस्तुस्थिति माहीत नाहीं—वाटेल तें लिहितात, तेंच सारे गिरवितात. पुन्हां तोंडभर बडबडतो. (जरा वेळानें ) स्वतांच्या सुखदुःखाच्या चार गोष्टी बोलाव्यात म्हटलं तर असलं कांहीं तरी मधेंच शिकतं. ( बऱ्याच वेळानें ) भाऊ, म्हणजे अलकाबद्दल मीं विचारच करायला हवा.

**भाऊकाका :** ( जरा वेळानें) मालक, आणखीन् एक गोष्ट सुचवावीशी वाटते अलका आणि ऊर्मिला बरोबरच्या. ऊर्मिलेचं लग्न ठरलं. आतां अलकाच्या पण लग्नाचं पाह्यला हवं.

**दाजीसाहेब :** भाऊ, आतां मात्र कमाल झाली ! मोठ्या माणसांनीं मुलांची लग्नं जमवण्याचे का दिवस हे ? त्यांचे हात एकमेकांच्या हातांत देण्यापुरता मोठ्या माणसांचा लग्नाशीं संबंध—

**भाऊकाका :** पण कधीं कधीं अशी वेळ येते कीं,त्यांत मोठ्या माणसांनीं लक्ष घालणं भाग पडतं.

**दाजीसाहेब :** अन् ही कोडीं सोडवते आहे ! लग्न जमवणं हें सगळ्यांत मोठं कोडं सोडवणं आहे म्हणावं ! (त्याच वेळीं ऊर्मिला आणि श्रीनिवास बरोबरच

बाहेरून येतात. ऊर्मिलाचा चेहरा उतरलेला, श्रीनिवास गंभीर.) यावंत मेस्टर अॅण्ड मिसेस डॉक्टर! आपल्याला हें असं आवडतं. असं जोडीनं पहिल्यांदांच घराबाहेर पडलेलं पाहिलं मीं तुम्हांला. (जरा वेळानें) पण काय रे श्री, दोघंहि अशीं अबोल नि गंभीर कां? श्री, आय् अॅम सॉरी, काय हो जांवईबापू, रागावलांत कीं काय आमच्या मुलीवर?

**भाऊकाका :** लग्न ठरलंय् ना त्यांचं! प्रेम करणारी बुलबुलाची जोडी गुलगुल गोष्टी करते, अन् लग्न ठरतांच मुक्याचं व्रत एकनिष्ठेनं पाळूं लागते म्हणतात. (जरा थांबून) जणूं लग्न म्हणजे शरिरानं जवळ येणं अन् मनानं दूर होणं वाटतं या तरुण माणसांना.

**ऊर्मिला :** (एकदम) भाऊ, ... (भाऊकाका एकदम चपापतात.) क्षमा करा भाऊ, पण ही असली थट्टा मला मुळींच आवडायची नाहीं, सांगून ठेवतें.

[ऊर्मिला एकदम घरांत जाते. क्षणभर स्तब्धता. भाऊकाका, दाजीसाहेब श्रीनिवासकडे पाहूं लागतात.]

**दाजीसाहेब :** श्री, काय झालं रे तिला? अशी रागावली कां ती एकदम?

**श्रीनिवास :** (जरा वेळानें) दाजीसाहेब, आजकाल तिची प्रकृति बरी नाहीं. यामुळें अगदीं हळवी झाली आहे ती.

**दाजीसाहेब :** अरे, पण असं होतंय् तरी काय? डॉक्टरांकडे तरी न्यायचं होतंस.

**भाऊकाका :** आतां हें पाहा! खुद्द श्रीनिवासच डॉक्टर असतांना!

**दाजीसाहेब :** आमचं हें असं होतं! श्रीनिवास डॉक्टर झाला हेंच विसरलों! मग कांहीं काळजी नाहीं. घरच्या पेशंटसाठीं घरचा डॉक्टर, पण काय रे, मामुलीच आहे ना?

**श्रीनिवास :** मला केस जरा चमत्कारिक वाटली म्हणून आजच डॉक्टर चरणना दाखविली.

**दाजीसाहेब :** (अधीरतेनें) मग काय म्हणाले ते?

**श्रीनिवास :** तिचं दुखणं मानसिक आहे, असं माझ्याप्रमाणें त्यांचंहि मत पडलं. उगीच काळजी करायची, मनमोकळेपणानं वागायचं नाहीं.

**दाजीसाहेब :** (एकदम) कसला हृद्रोग झालाय् तिला? या मुलांना आपण मोठीं झालों आहोंत हें केव्हां कळणार आहे कुणास ठाऊक! कुढेपणानें

वागायला काय झालं? अन् काळजी तरी कसली करते आहे? हवं तें द्यायला हा बाप जिवंत असतांना, जो बोलावा तो शब्द झेलायला श्रीनिवास काळजाची ओंजळ करीत असतांना, कसली काळजी करते आहे ही!

**भाऊकाका :** ( हंसत ) लग्नाची! दुसरी कसली काळजी करणार?

**दाजीसाहेब :** पण म्हणावं वेडाबाई, लग्नाची काळजी करायला लागलीस तर लग्न लांबणीवर पडेल हं! हो, या दुखण्यांनीं लग्न लांबायची वेळ नाहीं आली म्हणजे मिळविली.

**श्रीनिवास :** ( गडबडीनें ) मला तर वाटतं, शक्य तितक्या लवकर लग्न उरकावं.

**भाऊकाका :** ( थट्टेनें ) बरीच घाई झाली आहे तुम्हांला लग्नाची, श्रीनिवास!

**दाजीसाहेब :** बरोबर आहे त्याचं! एकदां लग्न ठरवलं, कीं लग्नाला उशीर काय कामाचा? आपल्याला पटलं! ( थोड्या वेळानें ) आहे काय त्यांत आठदहा दिवसांनीं बार उडवून देऊं! काय मोठंसं!

[ इतक्यांत फोन वाजतो. भाऊकाका रिसिव्हर घेतात. ]

**भाऊकाका :** हॅलो. मी भाऊकाका. नामदार दाजीसाहेबांचा खाजगी चिटणीस. अं? हो हो! आहेत, घरींच आहेत. त्यांनाच बोलावूं म्हणतां? ठीक. एक मिनिट हं—

**दाजीसाहेब :** ( रिसिव्हर घेऊन ) हॅलो. मी कर्णिक. चीफ मिनिस्टरनीं बोलावलंय्? तावडतोब? कां? विशेष कांहीं? अं...( जरा वेळानें ) बरं बरं. आलोंच इतक्यांत. जयहिन्द! ( रिसिव्हर ठेवतात. ) व्यापाऱ्यांनीं तर अगदीं ताळतंत्र सोडलंय्. कंट्रोल काढा—कापड स्वस्त होईल, म्हणून कंट्रोल उठवलं. लगेच किंमती तिप्पट, चौपट वाढल्या. सरकार काय रडणार? कुठलंही धोरण ठरवा, फायद्याचा झरा काळ्या बाजारांतून वाहतोय्. आतां वरतून कांहीं नवीन सूचना आली आहे, त्याचा तांतडीनं विचार करायचाय. वरून कांहीं आलं कीं खालीं गडबड!

**श्रीनिवास :** चौकांत फटके मारले पाहिजेत या काळाबाजारवाल्यांना!

**दाजीसाहेब :** बोलायला ठीक आहे. पण त्यांच्या पाठीवर मारलं तरी जनतेच्या पोटावर लागायचं तें! लगेच उत्पादनांत घट! ( एकदम ) पण हो, मला जायला हवं! चीफ मिनिस्टरनीं तांतडीची बैठक बोलाविली आहे. ( जातात. )

[ मोटार गेल्याचा आवाज ऐकूं येतो. क्षणभर भाऊकाका घुटमळतात. मग ते जिना चढून वर जातात. श्रीनिवास व्यग्र मनःस्थितींत तोंड झांकून बसलेलाअसतो. आंतून ऊर्मिला येते. ]

**ऊर्मिला** : ( जवळ जाऊन ) श्रीनिवास—

**श्रीनिवास** : अलका ! ( एकदम मान वर करून ) कोण ऊर्मिला ? ( थोडा-वेळ थांबून ) ऊर्मिला, संध्याकाळीं येतांना डॉक्टर चरणनीं लिहून दिलेलीं औषधं आणीनच मी.

**ऊर्मिला** : ( थोड्या वेळानें ) श्री, तूं औषधं आणूं नकोस ! ( एकदम ) हवींत कशाला तीं ? हवा कशाला जगण्याचा अट्टाहास एवढा ?

**श्रीनिवास** : ऊर्मिला, आतां मात्र रागावेन हं मी ! किती वेळां सांगितलं मीं तुला, कीं मीं जें ठरवलं आहे त्यांत बदल करणार नाहीं म्हणून. तेवढाच एक मार्ग उरलेला आहे. आतां कां विचार करते आहेस तूं ? साऱ्या गोष्टींवर एकदां पांघरूण घालायचं ठरल्यावर पुन्हां बाहेर डोकावायचं कशासाठीं ?

**ऊर्मिला** : ( उद्वेगानें ) अनैतिकतेवर नीतीच्या शालीचं पांघरूण घालण्याचा अट्टाहास...

**श्रीनिवास** : हो, तसंच समज ! ( थोडें थांबून ) त्या साऱ्या घडलेल्या गोष्टींवर विस्मृतीचं जाळंच टाकायला हवंय् ! ( जरा वेळानें ) ऊर्मिला, मघांशींच दाजीसाहेब तुझ्या तब्बेतीची चौकशी करीत होते....

**ऊर्मिला** : मग ? ( अधीरतेनें ) मग काय सांगितलंस तूं ?

**श्रीनिवास** : खरं तें ! दुसरं काय सांगणार ?

**ऊर्मिला** : श्रीनिवास—

**श्रीनिवास** : मीं त्यांना सांगितलं कीं, तूं हृद्रोगानें पछाडली आहेस ! हळवी झाली आहेस; दुबळी झाली आहेस. तुझा तुझ्या मनावर ताबा राहिलेला नाहीं. ( एकदम दूर होत ) या गोष्टीवर रामबाण उपाय म्हणून आठ–दहा दिवसांत लग्न उरकून टाकायचं पक्कं केलंय् त्यांनीं.

**ऊर्मिला** : अज्ञानाच्या पोटीं सुख दडलेलं असतं ! पपांना वाटतंय् कीं, एकदां पोरीचं लग्न झालं कीं तिला बरं वाटेल. तिचे सारे मानसिक रोग बरे होतील ! ( आवेगानें ) पण श्री, मला मात्र ह्यामुळें जास्तच त्रास होईल. तुफानात

सांपडलेल्या बोटींतल्या माणसाचा जीव काळाच्या कोपऱ्यांत ओढला जात असतो. त्याला वांचविण्यासाठीं अट्टाहासानं उडी घेणाऱ्या वेड्या माणसा-सारखी अवस्था झाली आहे तुझी. तूं त्यांतलं भय आणि भवितव्य कशा-कशाचाच विचार करीत नाहींस !

**श्रीनिवास :** होय, कशाचाच विचार करायचा नाहीं मला.

**ऊर्मिला :** पण श्री, तूं आपला आत्मनाश ओढवून घेतो आहेस ! तूं माझ्याशीं लग्न करायचं ठरवलंस. पण स्वतःची इच्छा नि प्रेम यांविरुद्ध घेतलेल्या निर्णयाच्या विरुद्ध तुझं मन धडपडतंय् ! किती फरक पडलाय् तुझ्या विचारांत नि वागणुकींत !

**श्रीनिवास :** कोण म्हणतं असं ?

**ऊर्मिला :** मी, ही ऊर्मिला ! उघड्या डोळ्यांनीं पाहाणाराला सारं दिसतं ! तुला स्त्रीची बेअब्रू पाहवली नाहीं, नेत्याचा मानबिंदु—सामाजिक प्रतिष्ठा कमी झालेली सहन होत नाहीं. अन् मी मात्र तुझी ही कुतरओढ उघड्या डोळ्यांनीं पाहूं ? कठोर अंतःकरणानं सहन करूं मी ? ( कळवळून ) मीं सारं विसरण्याचा प्रयत्न करायचा, तूं आपल्या प्रेमाला—अलकाला विसरणं शक्य नाहीं हे दिसत असतांना ?

**श्रीनिवास :** अलकावरील माझं प्रेम हें स्वप्न केव्हांच संपलंय् ऊर्मिला ? मी तिला विसरूं शकत नाहीं. ( घोटाळून ) खरं आहे. ( एकदम ) पण आपलं लग्न ठरल्यापासून मी शक्य तों तिला टाळीतच आलों आहें.

**ऊर्मिला :** पण तें तुला साधत नाहीं, साधणार नाहीं, तुझं मन अलकाशीं घोटाळतं आहे. पण तिच्या नजरेला नजर देण्याचं तुझं सामर्थ्य नाहीं. तुझा स्वतःवर विश्वास नाहीं म्हणून चुकवतोस तूं तिला.

**श्रीनिवास :** ( उत्तर न सुचून ) हें कांहीं एक ऐकण्याची इच्छा नाहीं माझी

**ऊर्मिला :** ( सुन्नपणें ) क्षणभर मला तुझं म्हणणं पटलं. मीं स्वार्थीपणानं संमति पण दिली. पण आतां मात्र मला वाटतं कीं, सारं कांहीं उघडपणें पपांना सांगावं. ते म्हणतील तें ऐकावं, देतील ती शिक्षा भोगावी ! ( आवेगानें नाहींच झालं एवढं धाडस तर खुशाल जीव द्यावा ! काय दुनिया ओस पडणार आहे त्यामुळें ? ( अस्वस्थपणें ) काय चमत्कारिक परिस्थिति निर्माण करून

ठेवलीस तूं श्रीनिवास ? माझ्या मूर्खपणामुळें मीच होरपळून निघालें होतें, पण तुझ्या माझ्याशीं लग्न करण्याच्या अट्टाहासानं आपण सारींच होरपळून निघणार आहोंत !

**श्रीनिवास :** ऊर्मिला, केवढ्या आवेशानें बोलतेस ! ( स्निग्धतेनें ) एवढ्याशा श्रमानं तुझं सारं अंग घामानें डंवरलं.

**ऊर्मिला :** ( दम लागून ) हे श्रम नाहींत, हा घाम नाहीं ! अंतरींची आग विझवण्यासाठीं हें साऱ्या रक्ताचं पाणी होत आहे.

**श्रीनिवास :** ऊर्मिला, ऊर्मिला, पुरे ! ( ऊर्मिलाचा हात धरतो. )

**ऊर्मिला :** पाहिलंस श्री, तुझा हात किती कांपतोय् तें ? तूं जन्मासाठीं माझा हात धरण्याचं ठरवलंस, पण तो क्षणाची सहानुभूति दाखवण्याचं नाकारीत आहे. ( दोघेहि बराच वेळ गप्प. )

**श्रीनिवास :** ऊर्मिला, इतका वेळ गप्प बसलों मी. त्याच त्याच गोष्टी उगाळण्याचा कंटाळा आलाय् मला ! पण माझा व्यक्तिशः विचार करून या गोष्टी चुकवाव्यात असं मला वाटत नाहीं. एका व्यक्तीच्या प्रेमापेक्षां एका स्त्रीच्या शीलाचं मोल मोठं आहे. एका व्यक्तीच्या आयुष्यापेक्षां एका पुढाऱ्याच्या प्रतिष्ठेची किंमत जास्त आहे. तुझ्या बाळानं 'पप्पा' म्हणून हांक मारावी असं माणूस हवं आहे ऊर्मिला ! म्हणूनच जें मीं ठरवलं, त्यांत कांहीं बदल होणार नाहीं ! तूं कांहीं म्हटलंस तरी त्यांत फरक होणार नाहीं. ( दूर होत ) मी जें करतोंय् त्यांत मला समाधानच आहे...

**ऊर्मिला :** परिस्थितीला तोंड देतां येइनासं झालं कीं माणूस तोंडाला येईल तें बोलतो. समाधान ! केवढा विचित्र शब्द आहे हा समाधान ! विवेक-बुद्धीविरुद्ध केलेल्या गोष्टींत समाधान ! स्वतःच्या प्रेमवैफल्यांत, दुसऱ्या-साठीं करावयाच्या त्यागांत समाधान ! ! ( आवेगानें ) नाहीं, श्रीनिवास, ही समाधानाची तृप्तता नाहीं...सारे समजुतीचे सुस्कारे आहेत—सारे समजुतीचे सुस्कारे !

[ क्षणभर स्तब्धता. ]

**श्रीनिवास :** ऊर्मिला, दाजीसाहेबांनीं माझ्यावर डोंगराएवढे उपकार केले आहेत, आभाळाएवढी सांवली दिली आहे त्यांनीं मला, सागराएवढं अथांग प्रेम आहे त्यांचं माझ्यावर. त्यांच्यासाठीं मी—

**ऊर्मिला :** ( एकदम ) पण पपांची सारी माया निरपेक्ष आहे श्री...

**श्रीनिवास :** ( जरा वेळानें ) क्षमा कर ऊर्मिला, पण ती केवळ निरपेक्ष मात्र नव्हती. त्यांना वाटत होतं कीं, मी ऊर्मिलाशीं...ऊर्मिला, तुझ्याशीं लग्न करावं ! ( दूर होत ) अन् म्हणूनच त्यांची संमति मिळवणं सोपं झालं...

**ऊर्मिला :** पण श्रीनिवास, यांत आणखी एक भयंकर प्रसंग निर्माण झालाय्. आजकाल नागेशनं अलकाशीं ओळख वाढविली आहे. तो तिच्याकडे वारंवार येत असतो. त्याच्या मनांत तरी काय आहे, याचा थांग लागत नाहीं. ( आवेगानें ) अन् मी सारं पपांना सांगेन...तर तूं माझं तोंड असं चमत्कारिक रीतीनं बंद केलं आहेस.

**श्रीनिवास :** ( आश्चर्यानें ) खरंच ! ( एकदम ) खरंच सांगतेस तूं हें ऊर्मिला ?

**ऊर्मिला :** हो. अन् हें सारं पाहून, साऱ्या गोष्टींचा विचार करून मीं ठरवलं आहे कीं, तुझं ऐकायचं नाहीं. मी पपांना सांगणार आहें कीं, मी पतिता आहें. पण माझ्यासाठीं श्रीनिवासचा बळी मी देणार नाहीं. ( एकदम घरांत जाऊं लागते. )

**श्रीनिवास :** ऊर्मिला, ( ऊर्मिला थांबते ) पण त्यापूर्वीच मी त्यांना सांगणार आहें कीं, मी आणि ऊर्मिला मोहाला बळी पडलों. जें होऊं नये तें घडलं आमच्या हातून ! मग मात्र खात्री पटेल त्यांची कीं, या साऱ्यांतून ऊर्मिला आणि श्रीनिवास यांचा विवाह हाच एक मार्ग आहे.

**ऊर्मिला :** खोटं ! खोटं ! ( याच वेळीं भाऊकाका माडीवरून खालीं उतरूं लागतात. ऊर्मिला एकदम गप्प होते नि घरांत निघून जाते. )

**भाऊकाका :** अरे, एवढं कसलं भांडण जुंपलं आहे तुमचं ? अं ? खऱ्या खोट्याचा शहानिशा करायला माझ्यासारखा न्यायाधीश भेटायचा नाहीं. ( श्रीनिवासजवळ जाऊन ) अर्थ काय समजायचा या असल्या वागण्याचा ? काय झालंय् ? मी मदत करूं शकेन तुम्हांला ?

**श्रीनिवास :** ( भान न राहून ) मालकांच्या खाजगी गोष्टींत तुम्ही पडूं नका भाऊ ऽ ऽ

**भाऊकाका :** ( विलक्षण संतापतात. पण सांवरून ) क्षमा करा. चूक झाली माझी. ( जरा वेळानें ) खुद्द मालकांनींदेखील मला अशी जाणीव दिली नाहीं

कधीं. बरं, जशी परमेश्वराची मर्जी! (श्रीनिवास आपल्या चुकीमुळें हतबल होतो.) पण श्रीनिवास, तुम्ही कांहींतरी लपवतां आहांत. कांहींतरी चुकवाचुकव चालली आहे तुमची. (जरा वेळानें) तुमची इच्छा नसली तर मर्जी! पण लक्षांत ठेवा, समाज कधीं बहिरा नसतो, तो आंधळाहि असूं शकत नाहीं. डोळे झांकले तरी ते लपंडावापुरतेच.

**श्रीनिवास :** भाऊकाका, क्षमा करा मला. अगदीं बेभानपणें मूर्खासारखं वागलों मी तुमच्याशीं. (भाऊकाका गहिंवरतात.) पण एक गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं,... (पुन्हां बोलतां बोलतां थांबतो.) जें घडणार आहे, त्यापेक्षां जें घडलेलं आहे तें भयंकर आहे. फार भयंकर आहे!

**भाऊकाका :** श्री, जो प्रकाशानं दिपवतां येतो, त्या अंधारांत तुम्ही कांहींच दडवूं शकत नाहीं. माझं आपलं एक भाबडं तत्त्वज्ञान आहे. पण नेहमीं मला वाटतं कीं, असत्य नि अत्याचार, अपहार आणि अनाचार हे सामाजिक गुन्हे आहेत. असल्या गुन्ह्यांवर पांघरूण घालणं हें त्या गुन्ह्यांना प्रोत्साहन देण्यासारखं आहे. अलकावर निर्व्याज प्रेम करणारा श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करायला तयार झाला, तेव्हांच मला वाटूं लागलं कीं, कुणाच्या तरी नीच कारस्थानाला बळी पडून तो फसतो आहे; ऊर्मिलासाठीं भयंकर संकटांत उडी घेतो आहे! भावनाप्रधान माणूस असं वागायला तयार होईल यांत मला आश्चर्य वाटत नाहीं.

**श्रीनिवास :** छेः फार गैरसमज आहे तुमचा श्रीनिवासबद्दल. श्रीनिवास भावनाशून्य आहे, बदमाष आहे, असं कांहीं दिवसांनीं कदाचित् तुम्हीच म्हणाल!

**भाऊकाका :** पण श्रीनिवास, तूं अस्वस्थ झाला आहेस, आपल्या जीवनकक्षेतून श्रीनिवास दूर गेला म्हणून अलका बेचैन आहे नि ऊर्मिला तळमळते आहे. उद्यां जर साऱ्या गोष्टी उघड झाल्या—मालकांना कळल्या तर काय होईल? श्रीनिवास, विवेकी माणसं रागावत नाहींत, पण त्यांचा क्रोध हा शापासारखा भयंकर असतो. (दोघेहि थोडा वेळ गप्प बसतात.) श्रीनिवास, त्या माणसाचं नांव काय? कोण तो?

**श्रीनिवास :** त्याचं नांव...(घुटमळतो. मग एकदम) त्याचं नांव श्रीनिवास! कळलं?

[ श्रीनिवास आपल्या खोलींत जातो. भाऊकाका जरा विचार करतात. नि मग ते पण माडीवर जातात. थोड्या वेळानें अलका येते नि आपल्या हातांतली पर्स सोफा सेटवर फेंकते. — गाणें म्हणूं लागते. तिचें गाणं संपतां संपतां नागेश प्रवेश करतो. ]

**अलका :** कोण नागेश ! आज उशीरसा झाला तुम्हांला यायला ? अन् हें काय, किती चिखल लागला आहे तुमच्या पायाना ! बागेंतून आलांत वाटतं ?

**नागेश :** होय ना ! आवारांतून आंत शिरत होतों तों तुमच्या बागेकडे लक्ष गेलं ! बाकी माळ्यानं बाग फार सुंदर राखली आहे हं ! गुलाबाच्या ताटव्या-वर फुलं इतकीं रसरसलीं आहेत कीं, वाटलं जावं नि खुडून घ्यावींत ! त्यांचा सुगंध लुटावा नि त्या धुंदींत जग विसरावं.

**अलका :** पण गुलाबाला कांटे असतात म्हणे !

**नागेश :** असेनात का ! ज्याला गुलाब हवेत तो कांट्यांची थोडीच पर्वा करतो ? ज्याला सुख हवं त्यानं त्याग करावा लागतो, स्त्री हवी त्यानं विरह सहन करावा लागतो. ज्याला लक्ष्मी हवी त्यानं—

**अलका :** नकटी बायको पण पत्करायला हवी ! ( दोघेंहि हंसतात. )

**नागेश :** अंहं. लाज-लज्जा, शरम-मुर्वत, सारं गुंडाळायला हवं. ( हंसतो. जरा वेळानें ) अलका, हीं फुलं, यांचा वास घेण्यापेक्षां त्यांचा छानदार हार गुंफावा आणि आपल्या प्रियतम माणसाला द्यावा, देवतेला वहावा कीं, जी प्रसन्न होते, जिला भावना कळतात !

[ अलका वेणीचे पेड उलगडीत आणि विणत अर्धवट आरशांत आणि अर्धवट नागेशाकडे पहात उभी असते. फुलांची ओंजळ घेऊन नागेश जवळ जातो. अलका चिडते. तोंच श्रीनिवास आपल्या खोलींतून बाहेर येतो. नागेश दचकतो. फुलांची ओंजळ गळून पडते. तो दूर होतो. ]

**श्रीनिवास :** नागेश—

**नागेश :** हॅलो ! कोण श्रीनिवास ! ( हंसतो. ) दाजीसाहेबांच्या मुलीशीं तुझं लग्न ठरलं म्हणे. अलकाच सांगत होती. कॉंग्रॅच्युलेशन्स हं !

**श्रीनिवास :** ( त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ) कां आलास पुन्हां तूं या घरांत ?

**अलका :** ( श्रीनिवासकडे न पाहतां ) नागेश माझ्याकडे आले आहेत !

**श्रीनिवास :** अलका, हा गृहस्थ या घरांत येतां कामा नये, पायरी चढतां कामा नये कधीं !

**अलका :** माझ्याकडे कुणी यावं, कुणीं येऊं नये हें पाहण्याची तुला जरूर नाहीं. माझी मी सज्ञान आहें नि बायको पण नाहीं कुणाची वाटेल तें ऐकून घ्यायला. ( नागेश जाऊं लागतो. ) नागेश, तुम्ही थांबा, तुम्हांला जाण्याचं मुळींच कारण नाहीं.

[ नागेश थांबतो. खालीं वांकून, पडलेल्या फुलांतील एक फूल उचलतो, वास घेतो. ]

**श्रीनिवास :** ( संतापानें नागेशकडे पहात ) ठीक आहे. पण अलका, याचा परिणाम मात्र चांगला होणार नाहीं. ( बॅग घेऊन बाहेर जातो. नागेश हंसतो. इतक्यांत माडीवरून भाऊकाका खालीं येतात. )

**अलका :** भाऊ...( बाहेर जाणारे भाऊ थांबतात. )

**भाऊकाका :** काय ग अलका ?

**अलका :** पपा आले नाहींत अजून घरीं ? मला हें त्यांना कळवलंच पाहिजे. मी नाहीं असले अपमान सहन करणार ! भाऊ, हे नागेश माझे मित्र, माझ्या-कडे आले, त्यांना 'बाहेर व्हा' म्हणून सांगण्याचं श्रीनिवासला काय कारण ?

**भाऊकाका :** त्याचं डोकं नाहीं ठिकाणावर. तें काय मनावर घेतेस तूं !

**अलका :** पण पपा—

**भाऊकाका :** दिवसभर घरींच होते आज. पण मघाशीं चीफ मिनिस्टरांचा फोन आला नि घाईघाईनं गेले त्यांच्याकडे.

**अलका :** म्हणजे त्यांना घरीं यायला उशीर होणार !

**भाऊकाका :** छेः ! मला नाहीं वाटत. उद्यां बैठकीपुढें निर्णय घेण्यापूर्वी थोड्याशा वाटाघाटी चालल्या असतील दुसरं काय ? तें कापडाचं कंट्रोल उठवल्यापासून साऱ्या किंमती वाढल्या, त्यावर कांहींतरी उपाययोजना असेल.

**अलका :** एकजात सारे काळाबाजारवाले मेले समुद्रांत बुडवले पाहिजेत. पण असं शिजतंय् तरी काय ?

**नागेश :** असेल झालं साऱ्या बड्या बड्या धेंडांची धरपकड...

**भाऊकाका :** काय आहे हरि जाणे ! पण विंचवाची नांगी ठेंचण्याचा विडा उचलला आहे मालकांनीं एवढं खरं ! आपल्याला काय करायचं आहे म्हणा ! आपण ना मंत्री, ना काळाबाजारवाले ! ( नागेश हंसतो. भाऊकाका जातात. )

**नागेश :** तुमचं घर म्हणजे बाकी राजकारणच आहे. जो तो बेत ठरवतो, गुप्तता राखतो नि लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकतो.

**अलका :** ( जरा वेळानें ) पण नागेश, तुमची आणि श्रीनिवासची मैत्री होती म्हणतां, मग एवढा कां रागावला तो तुमच्यावर ?

**नागेश :** अलीकडचं त्याचं वागणं मला पसंत नाहीं. मीं त्याचा उघड उघड निषेध केला, तेव्हांपासून तो रागावला आहे माझ्यावर.

**अलका :** मलासुद्धा त्याचं वागणं आवडलं नाहीं. सौंदर्य आणि संपत्ति याकडे उपभोगासाठीं पाहणारी माणसाची लोभट नजर पाहिली कीं मला-देखील संताप येतो....

**नागेश :** पण पुरुषानं विकारवश होणं हा स्त्रीच्या सौदर्याचा विजय कां नाहीं मानत तुम्ही बायका ?

**अलका :** जीं माणसं केवळ पैशामागं मृगजळासारखीं जातात, प्रेम, एकनिष्ठता, विसरतात, त्यांच्या मूर्खपणाची मला कींव येते.

**नागेश :** कींव ! तुम्ही बसा कींव करीत. पण असले व्यवहारी लोक जन्माचं कल्याण करून घेतात, सुखी होतात.

**अलका :** मला मुळींच वाटत नाहीं, कीं श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करून सुखी होईल.

**नागेश :** जरूर सुखी होईल. प्रेमाच्या शब्दापेक्षां पैशाची ऊब माणसाला सुखी करते. पैसा मिळतांच तो वाटेल तें विसरूं शकतो. वाटेल तें त्याला मिळूं शकतं. संपत्तीच्या ढिगाऱ्यांतून मुठी भरतांना त्याला हर्षवायु होतो, तो वेडा होतो ! बाकी साऱ्या गोष्टी त्याला मोफत वाटूं लागतात. ( भानावर येऊन ) तुम्हांला कल्पना नाहीं अलकाताई, पण श्रीनिवास हा एक नीच माणूस आहे. हातोहात त्यान बनवलं आहे साऱ्यांना ! उजाडलं म्हणजे ऊर्मिलाबाईचं कोबंडं आरवेल्च म्हणा ! पण त्याआधीं मी सांगतों कीं, तो एक पट्टीचा बदमाष माणूस आहे.

**अलका :** कुणीं विष ओतलं हें तुमच्या कानांत !

**नागेश :** श्रीनिवासनं ! खुद्द श्रीनिवासनं !! त्या वेळीं मी त्याचा मित्र होतों, आपल्या कारस्थानाच्या यशाचा त्याला कैफ चढला होता. त्या नादांत सारं त्यानं मला सांगितलं, जसा कबुलीजबाब दिला.

**अलका :** कसा विश्वास ठेवायचा मीं तुमच्या शब्दावर ?

**नागेश :** चार-सहा महिने वाट पहा. आपोआप विश्वास बसेल. श्रीनिवास नि ऊर्मिलाचं अजून लग्न व्हायचं आहे—

**अलका :** होईल तें आतां आठ-पंधरा दिवसांत...

**नागेश :** हो, पण अवघ्या चार-सहा महिन्यांत ऊर्मिलाला ' आई ' म्हणून हांक मारणारं बाळ जन्माला येईल. तेंच आक्रंदून सांगेल कीं, श्रीनिवास बदमाष आहे, त्यानं ऊर्मिलाला फसवलं आहे. मला पहातांच तो किती दचकला पाहिलास ! आपण ज्याला साऱ्या गोष्टी सांगितल्या तो नागेश हें तुम्हाला सांगेल म्हणून तो भ्याला. आपल्या कृतीच्या सांवल्यांना दचकला तो...

**अलका :** आज तुम्ही सांगतां आहांत मला हें !

**नागेश :** अलकाताई, कसं समजावूं मी आपल्याला. दाजीसाहेबांच्या मुलीच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविण्यापेक्षां जें लग्न होतंय्, तें बरंच नाहीं का म्हणायचं ? बाकी माणुसकी विसरणारीं हैवान माणसं पाहिलीं कीं वाटतं, चोरांची दुनिया आहे ही !

**अलका :** अजून विश्वास बसत नाहीं माझा.

**नागेश :** माझासुद्धां नसता बसला असं कुणीं सांगितलं असतं तर ! अहो, स्वार्थासाठीं एका स्त्रीच्या शीलाला, एका पुढाऱ्याच्या प्रतिष्ठेला त्यांचा आश्रितच असा सुरुंग लावील हें खरं तरी कसं वाटणार ? ( इतक्यांत बाहेर आवारांत मोटार शिरल्याचा आवाज येतो. नागेश गडबडीनें ) बरं आहे ! नामदारसाहेब घरीं आले वाटतं ! त्यांचा नि माझा परिचय नाहीं. मी जातों. पण एक मात्र लक्षांत ठेवा, कळकळीची विनंति आहे, श्रीनिवासवर लक्ष ठेवा. त्याच्यापासून ऊर्मिलाला—नव्हे दाजीसाहेबांनासुद्धां धोका आहे.

**अलका :** थांबा नागेश, पपा आलेच आहेत. त्यांनाच सांगा तुम्ही हें...

**नागेश :** ( घाईघाईनें ) ते माझ्यावर विश्वास ठेवणार नाहींत. मला ओळखत

नाहींत ते. (नागेश जातो, तेंव्हां दाजीसाहेब आंत येतात. ते त्याला पाठमोरा पहातात.)

**दाजीसाहेब :** अलका, कोण ग ? तुझा स्नेही वाटतं ? आजकाल तुम्हां तरुण-तरुणींची झटपट होणारी दोस्ती पाहिली म्हणजे आम्हांला तुमचा हेवा वाटतो. नाहींतर आमच्या वेळच्या गोष्टी. काळ बदलतो तो हा असा !

**अलका :** हें काय पपा, तुमचे पण बूट पाण्यानं नी चिखलानं भरले आहेत.

**दाजीसाहेब :** तुमचेपण ? म्हणजे ?

**अलका :** मघाशीं नागेश आले होते ना, ते पण असेच आले.

**दाजीसाहेब :** आले ! म्हणजे तुझा मित्र अं ? (जरा वेळानं) मी तरी तेंच, म्हणत होतों तुला कीं, हा माळी कुठं गेला ! आतां फाटकांतून आंत आलों, तर बागेंत पाण्याचा पाईप आपला खुशाल वाहतो आहे. गुलाबाचा ताटवा फुलांनीं बहरलेला, पण त्यावरचीं फुलं वाटेल तशीं तोडलीं आहेत कुणींतरी. (खालीं पहात) अन् इथं अशीं पायदळीं तुडवलीं जाताहेत ! या नोकर माणसांनीं संप पुकारला कीं काय ? छेः बुवा ! हें संपाचं राजकारण चुलीपर्यंत गेलेलं वाईट—चुलींत गेलं तर बरं ! (दाजीसाहेब बूट काढून ठेवतात. तेवढ्यांत अलका सपाता आणून देते.) राहूं दे. तूं कशाला उगीच—

**अलका :** काय झालं एखादे दिवशीं करावं लागलं तर !

**दाजीसाहेब :** बरं का अलका, मघाशीं बातमीदार आला होता तुझ्याकडे 'प्रजासत्ता' दैनिकाचा.

**अलका :** बातमीदार ? अन् माझ्याकडे ? मी कांहीं मंत्री नाहीं प्रांताची.

**दाजीसाहेब :** ए पोरी, तूंसुद्धां थट्टा करायला लागलीस हं ! काय मंत्रिपदाचा गुण आहे पहा, जो उठतो तो थट्टा नि टीका करूं लागतो. पण अलका 'प्रजासत्ता' चा बातमीदार तुझीच मुलाखत घ्यायला आला होता. त्यांच्या कोडें नं. ३६ चें बक्षीस मिळविणाऱ्या कुमारी अलका कर्णिक, यांची मुलाखत हवी होती त्याला. वल्लीच होती झालं एक ! अन् प्रश्न तरी काय ? म्हणे कोडं सोडवणं कष्टसाध्य आहे कीं दैवसाध्य ?

**अलका :** ( आपल्याशीं ) कुठलाही कूटप्रश्न कष्टांनीं—श्रमांनीं सुटत नाहीं. तो दैवाच्या करामतीनंच सुटतो.

**दाजीसाहेब :** अगदीं बरोबर. पण त्यांना वाटतं, कोडीं सोडवून कोडं बरोबर येतं. त्यांनीं विचारलं कुमारी अलका कर्णिक बक्षिसाच्या पैशांचं करणार तरी काय ?

**अलका :** मग काय सांगितलंत तुम्हीं ?

**दाजीसाहेब :** माझा ग काय त्या पैशांशीं संबंध ! पण तुझ्यातर्फे भाऊ-काकांनीं मात्र उत्तर दिलं...सांगितलं कीं, हुंडा देणार आहे ती आपल्या लग्नाचा.

**अलका :** चला, कांहींतरीच असतं भाऊंचं !

**दाजीसाहेब :** पण खोटं का आहे तें ? लग्न म्हटलं कीं हुंडा आलाच. आतां लग्न करायचं नसलं तर गोष्ट वेगळी. तुझा काय विचार आहे ? का राहाणार तशीच लग्न न झालेली बेगम...

**अलका :** बेगम म्हणून झुरायला अजून कुठल्या संभाजीवर प्रेम नाहीं बसलं माझं !

**दाजीसाहेब :** ( हंसत ) तूं कांहीं म्हण अलका, पण आपल्याला हें आवडतं ! लाजणं नाहीं. नाहीं तर आमच्या वेळीं ! लग्न म्हटलं कीं तें जमवायचं आई-बापांनीं नि मुलीनं लाजून दडायचं सांदी-कोपऱ्यांत. छेडलंच कुणीं तर म्हणा-यचं ' इश्श ' कीं झालं. आमची हीच पहाना ! जाऊं दे झालं, सुटली बिचारी ! असती तर ऊर्मिलाचं लग्न ठरलं याचा केवढा आनंद झाला असता तिला ! किती कौतुक केलं असतं तिनं !

**अलका :** ( विषय बदलण्यासाठीं ) पण पपा, एवढी कसली धामधूम चालली आहे गेले दोन दिवस ? काल घरीं यायला एक वाजला. आज ही तांतडीची सभा...

**दाजीसाहेब :** त्या व्यापाऱ्यांच्या विरुद्ध कारवाई चालली आहे ना ! म्हणावं, बच्चमूजी या वेळीं सरशी आमची !... कापडाचा एक सुतडा नाहीं जाणार काळ्याबाजारांत. ( विचार करीत ) बाहेर त्याची विवंचना नि घरांत ही नवी काळजी लावली आहे या ऊर्मिलानं. श्रीनिवासचं लक्ष आहे म्हणून बरं...

**अलका :** ऊर्मिलाची काळजी ? काय होतंय् तिला ?

**दाजीसाहेब :** तिला म्हणे मानसिक दुखणं झालं आहे ! एक एक नवे नवे

प्रकार! म्हणे कुठल्या तरी काळजीनं पछाडल्यासारखी—भ्यायल्यासारखी वागते ती. (आश्चर्यानें) म्हणजे तुला कांहींच माहीत नाहीं अलका?

**अलका :** (क्रुद्धपणें) मला माहीत आहे, पण मी तें तुम्हांला कसं सांगूं?... तुमची मुलगी ऊर्मिला—

**दाजीसाहेब :** (एकदम गोंधळून) तुझी बहीण ऊर्मिला—

**अलका :** अं हं! श्रीनिवासच्या नीच कारस्थानाला बळी पडलेली ऊर्मिला, असं म्हटलं तरच बरोबर होईल.

**दाजीसाहेब :** शट् अप्! श्रीनिवासबद्दल असलं बोलणं खपायचं नाहीं मला.

**अलका :** क्षमा करा पपा, पण मी जें म्हणतें तें अक्षर अन् अक्षर खरं आहे, अगदीं खरं आहे.

**दाजीसाहेब :** ऊर्मिलाचा हेवा करतेस तूं अलका?

**अलका :** नाहीं पपा, मला तिच्याबद्दल सहानुभूति वाटते.

**दाजीसाहेब :** छे! (जरा वेळानें) मघांशीं भाऊकाका म्हणाले तेंच खरं. तुला आतां या घराबद्दल आपलेपणा वाटत नाहीं. हें घर सोडून जाण्याचे विचार आजकाल तुझ्या मनांत येतात.

**अलका :** खरं आहे तें!

**दाजीसाहेब :** प्रत्येकजण एकमेकांशीं आपलेपणानें वागत असताना?

**अलका :** मीच फक्त या घरांत परकी अशी ठरलें आहें. थोड्याच दिवसांत हें घर म्हणजे एका स्वार्थी माणसाचं अधिराज्य होणार आहे. (आवेगानें) कसं समजावूं मी हें पपा... (थांबते, जरा वेळानें) इतके दिवस बोलायचं नाहीं म्हणून हे ओठ, सारे विचार, साऱ्या भावना नि दुःख अंतःकरणाच्या कोना-कोपऱ्यांत दाबून ठेवीत होतें. पण आतां मात्र मी त्यांत गुदमरून जाईन! आपण सारे होरपळून जाऊं...

**दाजीसाहेब :** अलका, जरा संयमानं... शांतपणानं.—

**अलका :** कुठला शांतपणा धरायचा? (एकदम जवळ जाऊन) खरं सांगा पपा, ममतेनं फिरणारा आपला हात, वात्सल्यानं न्हालेली आपली नजर, नेहमीं ममत्व अमृताचा वर्षाव करीलना या अलकावर?

**दाजीसाहेब :** पण अलका, तुला सांगायचं तरी काय आहे? हें शाब्दिक झालरीचं विणकाम पुष्कळ झालं! खरं काय सांगायचं आहे तुला?

**अलका :** पपा, तेज पाजळणाऱ्या दिव्याचं ऐश्वर्य दिसतं, पण धुरानं माखलेलं त्याचं अंतरंग दिसत नाहीं तसं झालं आहे. (जरा वेळानें) पपा, श्रीनिवासशीं ऊर्मिलाचें लग्न ठरलं, नव्हे, तें लग्न होणं अपरिहार्य आहे. पण ऊर्मिला मात्र त्या लग्नानं सुखी होणार नाहीं. (निक्षून) श्रीनिवासनं हें लग्न तिच्यावर लादलेलं आहे. ऊर्मिलावर श्रीनिवासचं प्रेम मुळींच नाहीं.

**दाजीसाहेब :** मग काय श्री तुझ्यावर प्रेम करतो होय? त्यानें ऊर्मिलाला मागणी घातली तरी म्हणे श्रीनिवासचं ऊर्मिलावर प्रेम नाहीं!...चमत्कार आहे! असं 'अमक्या अमक्यावर माझं प्रेम आहे हो' अशी दवंडी पिटून का प्रेम करतात माणसं? वेडी तर नाहींस? काय ग, चार लोकांत हातांत हात घालून फिरलं, वावरलं म्हणजेच प्रेम बसलं समजायचं होय?

**अलका :** (दूर जाऊन) पपा, तुम्ही विश्वास ठेवा अगर ठेवूं नका. पण श्रीनिवासला तुमची...इस्टेट हवी आहे; म्हणून त्याला ऊर्मिलाशीं लग्न करायचं आहे. तुम्ही आपल्याला—एका आश्रिताला—मुलगी देणार नाहीं अशी त्याला भीति वाटत होती. आणि म्हणून—पपा, कसं सांगूं मी सारं? कसा विश्वास बसेल तुमचा माझ्या शब्दावर?

**दाजीसाहेब :** सारंच विलक्षण आणि चमत्कारिक! थेट अगदीं आमच्या हिंदी सिनेमांच्या कथानकाचा प्लॉटच सांगतेस तूं मला...

**अलका :** नाहीं पपा, जें घडलं तें याहीपेक्षां वाईट आहे. ऊर्मिलाचं लग्न आपल्याशींच व्हावं, म्हणून श्रीनिवासनं तिला फसवलं आहे! पपा, पपा, (पाठ फिरवून) दिवस गेले आहेत ऊर्मिलाला. (दाजीसाहेब गंभीर होतात. विचारी बनतात. जरा वेळानें त्यांच्याजवळ जाऊन) पपा, रागावलांत माझ्यावर?

**दाजीसाहेब :** तुम्ही लहान मुलं किती अविचारी, किती अविवेकी, किती उच्छृंखल असतां! (पुन्हां विचार करीत) अलका, तूं सांगतेस या गोष्टीवर माझा विश्वासच बसत नाहीं. श्रीनिवास इतका उलट्या काळजाचा असेल हें खरं वाटत नाहीं मला.

**अलका :** पण पपा...(एकदम थांबते.)

**दाजीसाहेब :** आणि समज, तें खरं असलं! तरी माणसाच्या हातून घडलेला उच्छृंखलपणा हा त्यानं मुद्दाम फसवण्यासाठीं केलेला बलात्कार आहे असं कसं म्हणतां येईल? ज्या वयांत माणसाला सहवासाची ओढ असते, त्याच वयांत विकाराचा, वासनांचा पगडाच अधिक असतो. नाहीं येत माणसाला मोह टाळतां. प्रेम, प्रेम म्हणतां तें काय फक्त मानसिक नि वैचारिकच असतं? शारीरिक आकर्षणाचा संबंधच नसतो होय प्रेमाशीं.

**अलका :** पण पपा, श्रीनिवासचं ऊर्मिलावर प्रेम नव्हतं!

**दाजीसाहेब :** असं तूं समज. मला नाहीं तसं वाटत. श्रीनिवास कसाही असला तरी तो प्रामाणिक आहे, याबद्दल मला बिलकूल शंका नाहीं. पडला असेल तो मोहाला बळी. पण हातून उच्छृंखलपणा घडला, तो काय त्याच्या जन्माचं वाटोळं करील! म्हणे त्यानं ऊर्मिलाला फसवलं! अरे, तिला फसवायचं असतं तर तो लग्नाला तयार झाला असता कशाला? अलका, मला या बाबतींत तुझं कांहीं एक ऐकायचं नाहीं.

**अलका :** पण पपा, ऊर्मिलाला मात्र श्रीनिवासची पुरती ओळख पटली आहे! त्याची भीति हाच तिला जडलेला हृद्रोग आहे. स्वतःचा स्वार्थ साधण्यापुढें ज्याला नीतीची चाड नाहीं तो उद्यां तिच्या जिवावर उलटेल, तिच्या मुला...

**दाजीसाहेब :** अलका! (अलका गप्प होते.)

**अलका :** पपा, हें लग्न ठरल्यापासून श्रीनिवास बेगुमान झाला आहे. सगळयांशीं त्याचं वागणं बदललं आहे. माझ्याकडे येणाऱ्या नागेशना 'या घराची पायरी चढूं नको' म्हणून त्यानं सांगितलं. तो ज्या रीतीनं भाऊकाकांशीं वागतो, तसं पपा, खुद्द तुम्हीसुद्धां त्यांच्याशीं वागलां नाहींत कधीं! (जरा वेळानें) तसाच तो ऊर्मिलेला छळतो. तिला तें असह्य होत चाललं आहे. ती भ्यायली आहे. पपा...

[भाऊकाका बाहेरून येतात.]

**दाजीसाहेब :** भाऊ, श्रीनिवास कुठं आहे?

**भाऊकाका :** घरीं नाहीं? मग दवाखान्यांतच असणार.

**दाजीसाहेब :** भाऊ, त्याला आधीं फोन करा. म्हणावं आत्तांच्या आत्तां मीं घरीं बोलावलं आहे. साऱ्या गोष्टींचा मला स्पष्ट खुलासाच करून घ्यायला हवा.

**भाऊकाका :** ( रिंग करून ) हॅलो... ! काय रे, डॉक्टरसाहेब आहेत का दवाखान्यांत ? हें बघ, त्यांना म्हणावं आत्तांच्या आत्तां घरीं बोलावलं आहे तुम्हांला. ताबडतोब या. ( रिसिव्हर ठेवतात. )

**दाजीसाहेब :** सारं विचित्र ! किती अनपेक्षित ! ज्याला मीं संभाळला, लहानाचा मोठा केला तो मला फसवील ? माझ्या मुलीला फसवील ? इतका नीच बदमाष असेल तो ? ( जरा वेळानें ) भाऊ, मघाशीं मी वुइलबद्दल बोललों तुमच्याजवळ त्यांत...

**भाऊकाका :** मालक—

**दाजीसाहेब :** ( एकदम ) भाऊ, समजलं तुम्हांला अलका काय सांगते तें. ती म्हणते, ऊर्मिलाचं लग्न श्रीनिवासशींच व्हावं, तें अपरिहार्य व्हावं म्हणून श्रीनिवासनं तिला फसवलं, ( पाठ करून ) तिला दिवस गेले आहेत. ( पुढें होऊन ) तुमचा विश्वास बसतो या गोष्टीवर ?

**भाऊकाका :** मालक, काय सांगतां आहांत तुम्ही हें ! छेः असं होणं शक्य नाहीं. हें अगदीं खोटं आहे. श्रीनिवास बदमाष नाहीं. मालक, या साऱ्या प्रकरणामागं गूढ कारस्थान आहे नि दुर्दैवानं श्रीनिवास त्यांत गुरफटला आहे—बळी पडला आहे. श्रीनिवास उलट्या काळजाचा माणूस आहे, या संशयित दृष्टीनं त्याच्याकडे पाहणंच चुकीचं आहे. ( अलकाला उद्देशून ) अलका, मला तुझी मनःस्थिति समजते. पण श्रीनिवाससारख्या माणसावर कुठलाही आरोप करण्या-पूर्वी दहादां विचार करावा लागेल—दहादां विचार करावा लागेल ! अलका, कुणीं भरवली ही कल्पना तुझ्या डोक्यांत ? तुला कुणीं सांगितलं श्रीनिवासनं ऊर्मिलाला फसवलंय् हें ? नांव काय त्या माणसाचं अलका ?

**अलका :** त्याचं नांव श्रीनिवास.

**भाऊकाका :** त्याचं नांव श्रीनिवास ! पण मी सांगतों, कीं तो श्रीनिवास नाहीं. ( बऱ्याच वेळानें ) अलका, एक मात्र ध्यानांत ठेव कीं, तें नांव दडवूनच तुम्ही एका प्रामाणिक माणसाला आपल्या आयुष्यांतून उठवीत आहांत !

[ त्याच वेळीं आंतून ऊर्मिलाची भयंकर किंकाळी ऐकूं येते. क्षणभर सारेजण जागेला खिळून राहातात. पण मग अलका धावतच आंत जाते. मागोमाग भाऊकाका, दाजीसाहेब पण जातात. जरा वेळानें ऊर्मिला अलकाचा आधार घेत घेत प्रवेश करते. ]

**अलका :** ऊर्मिला, ऊर्मिला जागी झालीस ना नीट ?

**भाऊकाका :** चांगलीच भ्यालेली दिसते ही झोंपेंत !

**दाजीसाहेब :** पण अशा वेळीं अवेळीं झोंपावं काय वेड्यासारखं !

**अलका :** ऊर्मिला जागी झालीसना ?

**ऊर्मिला :** ( क्षीणपणें हंसत ) होय ग ! इतकी का गैरसावध झोंप आहे माझी ! अंमळ थकल्यासारखं वाटलं म्हणून आडवी झालें. जरासा डोळा लागला होता. तो तें भयंकर स्वप्न ! ( अंग शहारीत ) बाई ग ... नुसत्या आठवणीनें अंग शहारतंय् माझं अजून....

**दाजीसाहेब :** उगीच वेड्यासारखे विचार करायचे कांहींतरी. मग अशीं स्वप्नं पडतात.... मनीं वसे तें स्वप्नीं दिसे....

**भाऊकाका :** पण असं स्वप्न तरी कसलं पडलं ?

**अलका :** काय बाई तें तुझं किंचाळणं ! माझा तर जीव अगदीं उडून गेला ! पायच खिळले जागच्या जागीं.

**ऊर्मिला :** ( क्षीणपणें हंसून ) मग माझी तर कशी अवस्था झाली असेल याची कल्पनाच कर ! ( स्वप्न पहात असल्यासारखं थरथरत ) क्रूर डोळे, धार लावलेलीं लांब लांब नखं, लालसेनं लवलेली हांवरी नजर, असा तो भयंकर चेहरा माझ्याजवळ आला आणि बघतां बघतां -- मी ओरडतें आहें ; किंचाळतें आहें, याची पर्वा न करतां, खसकन् त्यानं माझ्या कुशींतलं बाळ घेतलं नि .... ( एकदम जीभ चावते. )

**दाजीसाहेब :** बाळ ! मूल .... ( बेचैन होतात. )

**अलका :** पाहिलंत भाऊ, आतां तरी विश्वास बसला तुमचा अलकावर ?

**भाऊकाका :** ( एकदम तिच्याजवळ जात ) बेटा ऊर्मिला, एवढी घाबरलीस तूं स्वप्नांत श्रीनिवासला पहातांच ?

**ऊर्मिला :** ( गोंधळून ) श्रीनिवासला पहातांच ( एकदम ) नाहीं ; तो चेहरा श्रीनिवासचा नव्हता — मुळींच नव्हता ...

**दाजीसाहेब :** ( कांहींशा रागानें ) मग कुणासारखा होता तो चेहरा ऊर्मिला ?

**भाऊकाका :** ( मृदुपणें ) आठव बेटा !

**ऊर्मिला :** नाहीं, तो कुणाचा होता हें मला आठवत नाहीं; पण तो फारच भयंकर होता. फारच भयंकर ...

**भाऊकाका :** मग तो त्याचाच ! (एकदम) नक्कीच श्रीनिवासचा.

**ऊर्मिला :** नाहीं ! नाहीं !! नाहीं !!! (त्वेषानें ती उठते आणि टेबलावर पडलेली वस्तु भाऊकाकांच्या अंगावर फेकूं लागते. तेवढ्यांत दाजीसाहेब आणि अलका तिला अडवितात. तिचा मनस्ताप वाढतो. – भावनातिरेकानें ती बेशुद्ध होते. )

**अलका :** ( एकदम ) ऊर्मिला.

[ त्याच वेळीं श्रीनिवास दारांतून आंत येतो. उर्मिलाला बेशुद्ध अवस्थेंत पाहून घाईघाईनें तिच्याजवळ जातो. ]

**श्रीनिवास :** एकदम काय झालं हिला ?

[ कुणीच कांहीं उत्तर देत नाहीं. तो ऊर्मिलाला सावध करण्यासाठीं उपचार करूं लागतो. भाऊकाका कांहींसे दूर उभे राहतात. अलका आणि दाजीसाहेब श्रीनिवासकडे रागारागानें पाहूं लागतात. ]

**अलका :** भाऊ, काय ही अवस्था ऊर्मिलाची !

**दाजीसाहेब :** भाऊ, मुद्दामच तुम्हीं ऊर्मिलाचा संताप वाढविलांत.

**भाऊकाका :** होय मालक, पण जें झालं तें बरंच झालं एका अर्थी.

**अलका :** ( गोंधळून ) भाऊ, याचा काय अर्थ ?

**भाऊकाका :** अलका, गाठी सुटत चालल्या आहेत, कोडीं उलगडत चाललीं आहेत....

**श्रीनिवास :** ( दचकून ) म्हणजे ?

[ कोणीच श्रीनिवासला उत्तर देत नाहीं. ऊर्मिला हळूहळू शुद्धीवर येते. डोळे उघडते. श्रीनिवास दूर होतो. ऊर्मिलासकट सर्वांच्या नजरा त्याच्यावर खिळलेल्या असतात. पण सारेच गप्प ! काय करावें हें न सुचून श्रीनिवास क्षणभर तिथें घुटमळतो नि मग आपल्या खोलींत निघून जातो. साऱ्यांच्या नजरा ऊर्मिलाकडे वळतात. अलका ऊर्मिला-जवळ जाते. ऊर्मिला मान फिरवते. भाऊकाका. अलकाजवळ जाऊन तिच्या अंगावरून हात फिरवतात. दाजीसाहेब दोन्ही हातांनीं डोकें धरतात. पडदा पडतो. ]

# अंक तिसरा

[ ना. दाजीसाहेबांच्या बंगल्याचा मुख्य दिवाणखाना. प्रसंग दुसऱ्या अंकाचे नंतर दोनतीन दिवसांनंतरचा. कालमानाप्रमाणें मांडणींत जेवढा फरक पडणं शक्य आहे तेवढा दृष्टीस पडतो. पडदा उघडतो.

अलका एकटीच वाचीत कांहींशी विमनस्क मनःस्थितींत अस्वस्थपणें येरझारा घालीत असते. शेवटीं तिला एकटेपणा असह्य होतो. ती रेडिओ लावते. त्यावर प्रसंगानुरूप पार्श्वसंगीत वाजत असतें. हळूहळू अलका गाणें गुणगुणूं लागते. एकाएकीं पार्श्वसंगीत बंद होतें नि आपल्याच नादांत असलेली अलका एकदम थांबते. ती रागानें रेडिओ बंद करते. त्या वेळीं बाहेर जाण्याच्या तयारीनें ऊर्मिला प्रवेश करते. ]

**अलका :** ( ऊर्मिलाजवळ जाऊन ) हें काय ऊर्मिला ! बाहेर निघालीस तूं ?

**ऊर्मिला :** हो. जरा काम आहे थोडंसं. जाऊन येतें.

**अलका :** पण ऊर्मिला दोनच दिवसांपूर्वी किती बिघडली होती तुझी प्रकृति ऊर्मिला, तुला विश्रांतीची फार आवश्यकता आहे.

**ऊर्मिला :** खरंच, मला पूर्ण विश्रांति हवी आहे. फार थकलें आहें मी...

**अलका :** पण मग ऊर्मिला, तूं कशाला बाहेर जातेस ? मला सांग, मी करीन तुझं राहिलेलं काम...

**ऊर्मिला :** ( विचित्रपणें हंसत ) तूं ? तूं माझं काम करणार ? नको ग बाई. मीच जातें. मला जायलाच हवं !

[ अलका कांहीं बोलण्यापूर्वी ऊर्मिला बाहेर पडते. त्याच वेळीं दारावर घंटा वाजते. ]

**अलका :** कम इन्, ( कांहींसा बिचकतच ' प्रजासत्ता ' चा बातमीदार प्रवेश करतो. ) कोण तुम्ही ?

**बातमीदार :** मी बातमीदार ! ( व्हिजिटिंग कार्ड देत, हंसत ) 'प्रजासत्ता' य सुप्रसिद्ध दैनिकाचा बातमीदार ! पण काय हो, नामदार दाजीसाहेब नाहींत ना घरांत ?

**अलका :** ( त्रासिकपणें ) तुम्ही आलांत कुणाकडे? क्षमा करा, नामदार दाजीसाहेब नाहींत ना घरांत असं विचारलंत म्हणून म्हणतें. तुमचं काम तरी कुणाकडे आहे ? कोण हवंय् तुम्हांला ?

**बातमीदार :** त्याचं असं झालं, आमच्या कोडें नं. ३६ चं बिनचूक बरोबर उत्तर सोडविणाऱ्या कुमारी अलका कर्णिक यांची खास मुलाखत घेण्यासाठीं म्हणून मारे आम्ही आलों अन् भेटले मात्र नामदार दाजीसाहेब ! ( हंसत ) जेव्हां भेटायला जावं तेव्हां कधीं चुकून भेटत नाहींत नि असे अचानक कधींतरी भेटतात हे बडे लोक ! म्हणजे त्याचं असं झालं, बोलण्यावरून बोलणीं निघालीं नि नामदारसाहेब आमच्यावर उगीचच चिडले. काय होतं कुणास ठाऊक ! पण जांवयाचं नांव काढलं कीं, हे मंत्री लोक एकदम चिरडीवर येतात. म्हणून विचारलं ! असलेच नामदारसाहेब घरीं, तर आल्या पावलीं आपलं माघारीं वळावं !

**अलका :** मंत्र्यांना भिणारा पहिलाच बातमीदार पहातें आहें मी आज ! (तरीही बातमीदार हंसतोच) पण आपल्या कामाबद्दल कांहींच बोललां नाहींत ?

**बातमीदार :** अरे हो, तें विसरूनच गेलों. नाहीं म्हणजे आम्हांला कुमारी अलका कर्णिक यांची मुलाखत हवी होती. गंमत काय झाली पहा, कोडेंबंदी करावी असं म्हणणाऱ्या मंत्र्यांच्या खुद्द पुतणीलाच कोड्याचं बक्षीस मिळालं. अहो, लांचलुचपतविरोधी आघाडीच्या लोकांनींच खुद्द घरासाठीं पागडी घ्यावी, नाहींतर दारूबंदी प्रचारसभेंत झोंकून आल्यासारखं भाषण ठोकावं. त्यांतला प्रकार झाला म्हणाना. त्यामुळें मोठी रंगणार आहे ही मुलाखत ! मुलाखत चांगली गाजली पाहिजे असा चंग बांधलाय् संपादकांनीं नि त्यासाठीं चकरा मारतोंय् मी ! आज तरी भेटतील का कुमारी अलका कर्णिक ?

**अलका :** ( एकदम ) कशा भेटणार ? थोडक्यांत चुकामूक झाली पहा तुमची. आतां पहा, इतक्यांत गेल्या त्या इथून बाहेर.

**बातमीदार :** म्हणजे या आतां बाहेर पडल्या त्या .... त्या ....

**अलका :** हो, त्याच कुमारी अलका कर्णिक !

**बातमीदार :** मग आपका शुभ नाम .... ( हंसतो. ) राष्ट्रभाषा आहे ना ?

**अलका :** मी ? माझं नांव ऊर्मिला...

**बातमीदार :** म्हणजे खुद्द नामदारसाहेबांची मु...कन्या आपण? (अलका हंसते.) वाः! हा तरी योगायोग म्हणायचा! नाहींतर आपली ओळख होण्याचा योग कशाला आला असता? पण काय हो, या कुमारी अलका कर्णिक भेटतील तरी केव्हां? परवां आलों तों बाहेर गेलेल्या. आज थोडक्यांत चुकामूक! संपादक म्हणतात, या बायका घरांत टिकत नाहींत म्हणून आमची कुटुंबव्यवस्था कोलमडली आहे. अहो, संसाराचं विश्व सोडलं नी विश्वाचं राजकारण सुरू केलं या बायकांनीं.

**अलका :** बातमीदार, तुम्ही एका स्त्रीसमोरच बोलतां आहांत हें! या बाहेरची हवा खाणाऱ्या बायकांच्या अंगांत वाऱ्यावर उडत लावण्याचं पाणी आहे बरं का, जरा बेतानेंच.

**बातमीदार :** वा : वा : ऊर्मिलाबाई, तुम्ही अगदीं छानपैकीं लेखिका व्हाल. वा! हवा काय! वारा काय! पाणी काय! खरंच ऊर्मिलाबाई, तुम्ही चांगलं लिहूं शकाल! आमच्या दैनिकाच्या शुक्रवारच्या अंकांत खास स्त्रियांसाठीं 'बायकांच्या बागेंत' नांवाचं सदर येतं. इतके दिवस आम्हांला स्त्रीलेखक न मिळाल्यामुळें आम्हीच कुणीतरी टोपण नांवानें लिहितों त्यांत...(एकदम) तुम्हीं वाचलंय् कधीं?

**अलका :** म्हणजे त्यांतला मावशीचा सल्ला, आजीबाईचा बटवा आणि काकूंच्या चटण्याकोशिंबिरींच्या कृति हेंच ना?

**बातमीदार :** मग? यांखेरीज स्त्रियांचे कुठले प्रश्न महत्त्वाचे आहेत? मंत्र्याची बायको झाली तरी तिलासुद्धां शेवटीं अन्नपूर्णा काढण्यापलीकडे काय नवीन सुचतं? मग आमच्यासारखे बायकांचीं टोपणनांवं घेऊन दुसरं काय लिहिणार बायकांसाठीं? (जरा वेळानें) जाऊं दे! मंत्र्यांच्या घरांत त्यांच्यावर टीका करूं नये, याचं भानच रहात नाहीं आम्हांला.

[नागेश येतो.]

**नागेश :** (अलका एकटीच असेल अशा समजुतीनें) कॉंग्रॅच्युलेशन्स अलका, तुला म्हणे कोड्याचं बक्षीस मिळालं! अलका...(बातमीदाराला पहातो नि दचकतो) एक्सक्यूज हं! मला वाटलं एकटीच आहेस!

**बातमीदार :** (गोंधळून) म्हणजे ऊर्मिलाबाई, आपलंच नांव अलका कर्णिक?

छान ! बातमीदारांशीं खरं बोलायचं नाहीं अशी शपथ घेतली आहे कीं काय साऱ्या जणांनीं ? ( जरा वेळानें ) बरं झालं, आत्तांच समजलं खरं काय तें. शिवाय पुन्हां मुलाखतीला येण्याचा त्रास पण वांचला !

**अलका :** ( एकदम ) हें पहा बातमीदार, मीच अलका कर्णिक ! पण कोडं मीं सोडवलंच नाहीं, तर मला बक्षीस मिळणार कसं ? दुसरीच कुणीतरी अलका कर्णिक असेल एखादी !

**बातमीदार :** पण हा पत्ता कसा चुकेल ?

**अलका :** मग माझ्या नांवावर कुणींतरी दुसऱ्यानं उपद्व्याप केलेला दिसतो. त्याचा काय नेम ? तुम्ही नाहीं का वाटेल त्याच्या नांवान लिहीत ? त्यांतलाच प्रकार !

**बातमीदार :** असं म्हणतां ! तर मग मुलाखत न छापलेलीच परवडेल ! अहो, एका मंत्र्याच्या पुतणीला बक्षीस मिळालं हा काय थोडा गाजावाजा झाला.... शंभर मुलाखतींचं काम होईल ! ( जाऊं लागतो. थांबून ) अरे हो, विसरूनच चाललों होतों मी बरं का, डॉक्टर श्रीनिवास, ( नागेश अस्वस्थ होतो. जरा हलक्या आवाजानें ) तुम्हीं ती कळविलेली बातमी आम्ही छापणार, उद्यां अगदीं बार उडवून देतों बघा. पहिल्या पानावर जाड्या टाइपांत ठोकतों ती बातमी ! एकदम सेन्सेशनल ! ( हंसतो. )

**अलका :** ( गोंधळून ) एवढी कसली बातमी आहे अगदीं सेन्सेशनल ठरण्यासारखी ?

**बातमीदार :** ( भान न राहून ) कापडधोरण फुटल्यामुळें मंत्रिमंडळांत मतभेद ! नामदार दाजीसाहेब कर्णिक राजीनामा देणार ! आमच्या खास बातमीदाराकडून ! ( हंसतो. ) आमचा उद्यांचा अंक म्हणजे कर्णिक स्पेशल अंकच निघणार म्हणाना ! पहिल्याच पानावर नामदार दाजीसाहेबांच्या राजीनाम्याची बातमी, तर शेवटच्या पानावर कुमारी कर्णिक यांना कोडेंक्रमांक ३६ चें पहिलें बक्षीस मिळाल्याची बातमी. अहो उद्यां रस्त्यावर कार्टीं 'प्रजासत्ताऽऽ'...करून ओरडायला लागलीं कीं, नाहीं त्यांनीं गिन्नीच्या ठिकाणीं चवल्यापावल्या गोळा केल्या तर नांव नाहीं सांगणार !...

**अलका :** टोपणनांवानं लिहिणारला सांगण्यासारखं स्वतःचं नांव असतं

म्हणायचं! पण काय हो बातमीदार, या घरात आम्हांला पपा राजीनामा देणार याचा पत्ता नाहीं अन् तुम्हांला कसं कळलं तें?

**बातमीदार :** सुतानं स्वर्गाला जाण्यासाठीं स्वर्ग आहे कीं नाहीं कुणास ठाऊक; पण बातम्या काढून असले अंदाज बांधणं अवघड नाहीं. मंत्रिमंडळांत मतभेद होताहेत असं कळतांच एखाद्या मंत्र्याचा राजीनामा, मग राजीनामा देणाऱ्या मंत्र्याची हायकमांडकडून निःपक्षपाती चौकशी आणि शेवटीं राजीनामा देणाऱ्या मंत्र्याची कुठल्या तरी देशांत वकील म्हणून नेमणूक, हें आजच्या राजकारणाचं तंत्रच आहे, त्याला काय करणार?

**अलका :** पण या सगळयांशीं पपांचा काय संबंध?

**नागेश :** ( गडबडीनें ) बातमीदार, सेन्सेशनल म्हणून गाजवायची आहे ना तुम्हांला ती बातमी? मग अशी सांगून काय टाकतां? ( गप्प रहाण्याची खूण करतो. )

**बातमीदार :** छे छे! असा कसा मी सांगत सुटेन? इतका का मी हा आहें? ( हंसतो. ) बरं आहे ऊर्मिलाबाई...नाहीं अलकाबाई, जातों आम्ही... ओळख-बिळख ठेवा! ( नमस्कार करतो, जाऊं लागतो. )

**अलका :** ( एकदम पुढें होऊन ) थांबा, थांबा बातमीदार! ( तो थांबतो पण अलकाच्या मागें उभा असलेला नागेश त्याला जाण्याची खूण करतो, तो घाईघाईनें निघून जातो. ) नागेश, तुम्हीं घालवलं त्याला ... ( जरा वेळानें ) नागेश, कोणती बातमी कळविलीत त्याला तुम्हीं?

**नागेश :** कुणी मीं? छे :! कांहीं तरी गैरसमज होतोय तुझा...तुमचा.

**अलका :** नाहीं. माझी पूर्ण खात्री झाली आहे, श्रीनिवासच्या नांवानं तुम्हींच ती बातमी प्रजासत्ताच्या संपादकांना कळविलीत...सांगा–सांगा काय सांगितलंय् तुम्हीं? भलतंच कांहीं छापण्यापूर्वी पपांना त्याचा खुलासा करतां आला पाहिजे. नागेश, तुम्हांला कल्पना आहे? मंत्रिपदावर असलेला एक जबाबदार माणूस असल्या खोट्या अफवांनीं अविश्वासू, स्वार्थी ठरेल. नागेश,... नागेश सांगा, काय सांगितलंत तुम्हीं त्या बातमीदाराला? कां तुम्हीं ती बातमी श्रीनिवासच्या नांवानं पाठवण्याचा उपद्व्याप केलांत? बोला...

**नागेश :** माझं ऐकून तर घेशील अलका...

**अलका :** मला कांहीं एक ऐकून घ्यायचं नाहीं. उगीच श्रीनिवासवर नाहीं नाहीं ते आळ येणं मला आवडणार नाहीं. मी नाहीं ऐकून घेणार ते.... नागेश, बातमी मशीनवर चढण्यापूर्वीच आपण थोपविली पाहिजे. बातमी छापली जाईल, अफवांच्या एकएक वावड्या उडूं लागतील, त्यापूर्वीच नागेश, तुम्ही आत्तांच्या आत्तां संपादकाकडे जाऊन साऱ्या गोष्टींचा खुलासा कराल ? ( जरा थांबून ) निदान पपांना तरी कळवूं या.... तुम्हांला समजलेल्या गोष्टींचा खरेपणा पडताळून पहाण्याची संधि मिळूं दे त्यांना....

**नागेश :** छे ! तें शक्य नाहीं. अशा गोष्टींचा का खुलासा करायचा असतो ! शिवाय ही बातमी मला समजली ती खुद्द श्रीनिवासकडूनच.

**अलका :** झूट ! अगदीं झूट ! श्रीनिवास तुम्हांला हें सांगणार ? ज्याला तुमचं तोंड पहाण्याची इच्छा नाहीं, ज्यानं तुम्हांला या घराची पायरी चढण्याची बंदी केली तो श्रीनिवास तुम्हांला हें सांगणार ? ही निव्वळ थापेबाजी आहे. शुद्ध बनवाबनवी आहे ! ( एकदम ) खरं सांगा नागेश, तुम्हीं श्रीनिवासवर केलेले सारे आरोप असेच खोटे आहेतना ? ऊर्मिलाला फसविणारा माणूस श्रीनिवास नाहीं. असं भाऊकाका म्हणतात.... हें खरं आहे ना ? बोला, सांगा...

**नागेश :** तो म्हातारा कारकून तुमच्या मनांत कांहींतरी भरवून देतो...

**अलका :** नागेश !

**भाऊकाका :** ( बाहेरून गडबडीनें येत ) काय चांचेगिरी चालली आहे सगळीकडे ! कुणींतरी ऊर्मिलाला फसविलं आहे, कुणींतरी श्रीनिवासला फसविलं आहे नि आतां तर गांवांत खुद्द मालकांच्या विरुद्ध नाहीं नाहीं त्या अफवा उठताहेत ! मालकांनीं म्हणे, मंत्रिमंडळ कापडटंचाईवर जी उपाययोजना करणार आहे त्याची बातमी बाहेर फोडली, अन् म्हणून व्यापाऱ्यांनीं रातोरात सारं कापड पार दडवून टाकलं. या साऱ्याचा अर्थ तरी काय समजायचा,

**अलका :** ( त्वेषानें ) याचा अर्थ.... याचा अर्थ...., भाऊ, यांना विचारा ! पपांच्या विरुद्ध नाहीं नाहीं त्या उठविलेल्या बातम्यांचा जनक हा माणूस आहे. .... याला विचारा त्याचा अर्थ ! ( घाईनें ) पण भाऊ, ही बातमी छापण्याचं टाळायचं कसं ? काय करूं मी ? ( क्षणभर विचार करून ) भाऊ, मीच प्रजा-

सत्ताच्या कचेरींत जाऊन संपादकांना भेटतें. पहातें कांहीं जमलं तर, पण तोंवर यांना मात्र इथून सोडूं नका. नाहींच कांहीं दाद लागूं दिली, तर खुशाल पोलिसच्या हवालीं करा यांना. ( जाते. )

**भाऊकाका :** ( तिच्यामागें जलदीनें जाणाऱ्या नागेशला अडवून ) नागेश ! माझं ऐका, मी आपल्या हिताचं सांगतोंय्, तिला अडवूं नका. त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं.

**नागेश :** ( अस्वस्थपणें ) मला कुणाचाच सल्ला नको आहे. मी दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी पीत नसतों. दुसऱ्याच्या बुद्धीनं चालत नसतों मी !

**भाऊकाका :** अन् म्हणूनच स्वतःच्या पायावर असा धोंडा पाडून घेतां ! आज एका मंत्र्याच्या विरुद्ध ज्या अफवा उठताहेत, त्याचे जनक आपण आहांत. येथून आपण बाहेर पडतांक्षणींच आपल्याला पकडण्याची व्यवस्था करणं खरोखरच मला अवघड नाहीं. ( भाऊकाका टेलिफोनकडे पहातात. नागेश अस्वस्थपणें बसतो. सिगरेट पेटवितो. ) नागेश, तुम्ही आलांत तरी केव्हां इकडे ?

**नागेश :** हा इतक्यांतच ! पण कुठून आलों असं झालंय्, सगळा घोटाळा, सारा गैरसमज ! जग म्हणजे एक वेड्यांचा बाजार आहे झालं !

**भाऊकाका :** नागेश, तुम्ही गेलां होतांत कधीं वेड्यांच्या हॉस्पिटलमधें ?

**नागेश :** छेः ! तशी वेळच नाहीं आली अजून...

**भाऊकाका :** अस्सं ? ( हंसत ) नाहीं, म्हणजे कुणाला भेटायला वगैरे तरी कधीं... ?

**नागेश :** ( भाऊकाकांच्या बोलण्याचा अर्थ न कळून, गोंधळून ) तिथले एक एक प्रकार ऐकले, वाचले कीं आपलं कांहीं धारिष्ट होत नाहीं तिथं जाण्याचं. अहो, शहाण्याला वेड लावायचे हे वेडे लोक...

**भाऊकाका :** पण तिथं मात्र शहाण्यांनींच वेड लावलेले वेडे असतात. जें शहाणपण तुम्हां–आम्हांला नाहीं तें त्यांना असतं. फसवाफसवी नाहीं, शहाणपणाचा बाजार नाहीं, व्यवहाराची सट्टेबाजी नाहीं...सगळं कसं सुतासारखं सरळ ! अन् तरीसुद्धां जगाला वेडयांचा बाजार म्हणतात. कारण तिथें-

सुद्धां एक वेडा दुसऱ्याला वेडा आहे झालं, असंच समजतो, खांदे उडवतो, क्षुद्रतेनें हंसतो.

**नागेश :** ( कांहींसा आपल्याशीं ) पण जर का त्या कळपांतले वेडे मोकाट सुटले—

**भाऊकाका :** अहो, सुटले तर काय...असे कित्येक वेडे मोकाट सुटलेले आहेत. ( जरा थांबून ) माफ करा नागेश, पण आपणसुद्धां एखाद्या वेड्याप्रमाणेंच—

**नागेश :** दाजीसाहेबांच्या घरांत एका कारकुनाची लुडबुड चालली तरी एखादा तिऱ्हाईत ती गोष्ट मुकाटपणें चालू देणार नाहीं भाऊकाका !

**भाऊकाका :** खरं असेल तें मालकांसमोरसुद्धां बोलेन मी. नागेश, कुणाला कांहीं कळत नाहीं, आणि सारेजण आंधळ्यांची माळ धरल्यासारखे जगांत चांचपडत असतात, असा फार मोठा गैरसमज झाला आहे तुमचा. पण ऊर्मिला, श्रीनिवास आणि अलका या सगळ्यांशीं तुम्ही ज्या पद्धतीनं वागत आहां ती पद्धत पाहिली म्हणजे वाटूं लागतं कीं, एखादा वेडा तरी मोकाट सुटलेला आहे, नाहीं तर एखादा सैतान वावरतो आहे आसपास !

**नागेश :** ( ओरडून ) भाऊ ! ( जरा वेळानें ) फार भयंकर आरोप आहेत हे भाऊ !

**भाऊकाका :** होना. मी तरी तेंच म्हणतों. फार भयंकर गोष्टी करीत आहांत तुम्ही—

**नागेश :** कुठल्या आधारावर दाजीसाहेबांचे कारकून हा आरोप करीत आहेत ?

**भाऊकाका :** आधार एक का आहे ? नागेश, तुम्हीं ऊर्मिलाला फसवलं आहे, तुम्हीं तिला जगांतून उठवली, तिची बेअब्रू करण्याचा प्रयत्न केलांत, म्हणून श्रीनिवासनं ऊर्मिलाशीं लग्न करायचं ठरवलं.

**नागेश :** साफ खोटं आहे हें ! दाजीसाहेबांना लुटतां यावं म्हणून श्रीनिवासनंच तें कारस्थान रचलं. ऊर्मिलेला त्याच्याशीं लग्न करणं भाग पडावं हा त्याचा उघड हेतु होता. माझा नि ऊर्मिलेचा परिचयदेखील नाहीं, तिथें—

**भाऊकाका :** अस्सं ! ( खिशांतलीं पत्रें काढून ) मग ऊर्मिलेच्या खोलींत सांपडलेलीं हीं प्रेमपत्रं काय श्रीनिवासनं तुमच्या नांवानं लिहिलीं होय ? नागेश, तुम्हांला कदाचित ठाऊक नसेल. पण मला माहीत होतं. ऊर्मिलाला माहीत

होतं कीं, श्रीनिवास आणि अलका एकमेकांवर प्रेम करतात. श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करण्याचं ठरवलं, त्याच वेळीं ती गोष्ट मला चमत्कारि वाटली. माझा त्यावर विश्वास बसेना. हें असं कां घडतंय् कळेना मला. प ऊर्मिलाला दिवस गेलेत हें काल मला कळलं. क्षणांत कुठल्या परिस्थितीं श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करायला तयार झाला याची कल्पना आली. (ज वेळानें ) मीं श्रीनिवासला विचारलं, अलकाला छेडलं, पण तें नांव मला कळ नाहीं. एकट्या ऊर्मिलानं मात्र निक्षून सांगितलं...कीं तो श्रीनिवास नाहीं.. ( पुन्हां थांबून ) त्या बदमाष माणसाचं नांव समजण्यासाठीं—

**नागेश :** भाऊ !

**भाऊकाका :** ( त्याच्याकडे दुर्लक्ष करून ) मीं आज ही चोरी केली. खु मालकांच्या घरांत—खुद्द मालकांच्या मुलीच्या खोलींत. माझ्या कल्पनेप्रमा मला तिथें हीं प्रेमपत्रं सांपडलीं. तीं प्रेमपत्रं लिहिणारा नागेश आज अ अचानकपणें भेटला. ( इतक्यांत विलक्षण चपळाईनें नागेश भाऊकाकांच्य हातांतील त्या पत्रांवर झेप घालतो ती चुकवून ) छेः ! इतकं सोपं नाहीं नागेश ! या पत्रांच्या उपयोगानं मला श्रीनिवासवरचे आरोप दूर करावया आहेत. कदाचित् एका स्त्रीसाठीं तुम्ही यांतून सहीसलामत सुटला असतां उजळ माथ्यानं वावरलां असतात, पण शिशुपालाचे शंभर अपराध भरावे तसं झालं. वर्तमानपत्रांना खोट्या बातम्या पुरवून एका मंत्र्याची खोटी नालस्त केल्याबद्दल मात्र तुम्ही आज सुटणार नाहीं नागेश. ( नागेश दोन्ही हातांन कानशिलें दाबतो. एकदम भाऊकाका आपलं बोलणं थांबवतात. नागे अस्वस्थपणें सिगरेट फेकून देतो. )

**नागेश :** संपलं आपलं बोलणं ? ( भाऊकाका विलक्षण आश्चर्यचाकित होतात. खरं आहे तुम्ही म्हणतां तें. मीं ऊर्मिलाला फसवलं. मीं श्रीनिवासच्या दुबळ्य मनोवृत्तीचा फायदा घेतला. प्रेमनिराशेनं विद्ध झालेल्या अलकाची नाजू अस्वस्थता माझ्या उपयोगी पडली. अन् भाऊ, तरीही मी सांगतों, तुम्ह मला कांहींही करूं शकणार नाहीं. धारिष्टच होणार नाहीं तुम्हांला. एका बड्य धेंडाची–खुद्द दाजीसाहेबांची–इभ्रत मला वांचवील. ( जरा वेळानें ) नामदा दाजीसाहेबांच्या बेगडी मोठेपणाला नि ढोंगी देशसेवेला सुरुंग लावण्याच ज्यानें चंग बांधला होता, तो काय इतक्या अविचारानं वागेल ?

**भाऊकाका :** यापेक्षां चांगले शब्द आहेत मराठी भाषेंत.

**नागेश :** यापेक्षां वाईट शब्द शोधून सांपडले नाहींत मला. ( इतक्यांत श्रीनिवास बाहेरून येतो. नागेश आणि भाऊकाकांना तो पहातो, तोंच— ) तूं पण आलास श्री. माझ्या आयुष्यांत मित्र म्हणून, एकच श्रीनिवास मीं जवळ केला. पण तोदेखील माझा हेतु साधण्यासाठीं...श्री, हेंच मी भाऊंना सांगत होतों इतक्यांत.

**श्रीनिवास :** नागेश, याचा काय अर्थ ?

**नागेश :** अर्थ ? अगदीं सोपा, अगदीं सरळ, अगदीं उघड आहे ! जें तूं लपवून ठेवलंस तें हुडकून काढण्यांत भाऊकाकांनीं यश मिळवलं. मीं ऊर्मिलाला लिहिलेलीं प्रेमपत्रंच त्यांनीं काबीज केलीं. त्यांच्या प्रेमळपणाचा, स्वामि-निष्ठेचा विजय झाला. ज्या वखवखीनं मी वावरलों, ज्या कारणासाठीं मी वणवा पेटवीत सुटलों— ( अस्वस्थपणें ) फार मोठा इतिहास आहे तो ! दाजी-साहेबांच्या चरित्राचं, माझ्या चरित्राचं तें एक पर्व आहे.

**भाऊकाका :** ( आश्चर्यानें ) नागेश, मालक तुम्हांला ओळखतात ? तुमचा आणि त्यांचा कांहीं संबंध ?

**नागेश :** आमची ओळख ते विसरले असतील. पण त्यांचा आणि आमचा संबंध मात्र फार पूर्वींचा आहे. त्या संबंधाची दाट छाया आमच्या साऱ्या कुटुंबावर पडलेली आहे. ( त्याच्या मनावरचा ताबा नाहींसा होतो. ) गुलाबी स्वप्नांची धुंदी डोळ्यावर असावी, मऊ रेशमी केस कानाशीं गुदगुल्या करीत असावेत, कुठल्या तरी अननुभूत स्पर्शाला जीव शोधीत असावा, असं साऱ्यांनाच वाटत असतं. पण त्या साऱ्या जुन्या आठवणींनीं अननुभूत स्पर्शाचे रोमांच विरतात आणि अंगावर अगदीं कांटा उभा राहतो. ( आवेगानें ) भाऊ, हरिश्चंद्राच्या सत्त्वशील मार्गानं जाण्याची साऱ्यांचीच इच्छा असते, पण मेलेला मुलगा—मेलेलं मन—जिवंत होतं तें एकट्या हरिश्चंद्राचं !

**श्रीनिवास :** नागेश —

[ भाऊकाका त्याला गप्प रहाण्याचें खुणावतात. ]

**नागेश :** लहानपणीं गरिबी होती आमची ! गरिबी कसली, ओढवून घेतलेलं दारिद्य तें ! घरची चांगली श्रीमंती, पण क्रांतीच्या तुतारीनं तिचा बाजा

वाजवला. स्वार्थत्यागाचा अर्थ तिनं सांगितला, पण सर्वस्वाचा अनर्थ तिनं लपवला. प्राण पणाला लावून आणि घरादारांवर लाथ मारून माझे वडील क्रांति-युद्धांत पडले. पण त्यांना कधींच कळलं नाहीं कीं, पैशावर मारलेली लाथ नेहमींच पोटावर बसते—स्वतःच्या पोटावर !

**भाऊकाका :** नागेश, देशासाठीं प्राण पणाला लावणाऱ्या त्यागाला फार कमी किंमत देतां तुम्ही ?

**नागेश :** भाऊ, भावनेच्या भरांत दादांनीं त्यागाचं दान दिलं आणि दारिद्र्याचा वर घेतला. ( थोड्या वेळानें ) पण त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांची सारी मिळकत सरकारजमा झाली. पांच वर्षांची शिक्षा झाली त्यांना —

**श्रीनिवास :** अरेरे !

**नागेश :** नुसतं अरेरे ! पण एवढया कोरडया सहानुभूतीलासुद्धां आम्ही महाग झालों. दादांनीं तुरुंगाचा रस्ता पकडला. घरांत आई, मी आणि धाकटा भाऊ ! अब्रूदार कुटुंबांतलीं माणसं आम्ही आणि देशभक्तीचे टिळे कपाळीं लागलेले. कुणाजवळ भीक मागायची ? कुणासमोर तोंड वेंगाडायचं ? आज भात तर उद्या कण्या, अन् परवां नुसती पेज, यांवर आम्हीं भावंडांनीं पोट भरावं आणि त्याच तृप्तीनं आईनं ढेकर द्यावी असे आम्ही जगलों. फीला पुरेसे पैसे नाहींत म्हणून शाळांचीं वर्षेंच्या वर्षें फुकट गेलीं आमचीं. ( एकदम मागें वळून ) पण त्यागी वीरांच्या नांवानं निघालेल्या फंडांतील एक पैही नाहीं मिळाली आम्हांला. आम्ही त्यांच्या स्मृति नव्हतों, जिवंत प्रेतें होतों आम्ही !

**श्रीनिवास :** नागेश, किती भयंकर बोलतोस तूं !

**नागेश :** पाहिलंस श्री, नुसत्या आठवणी किती भयंकर आहेत त्या ! पण त्या परिस्थितींत आम्ही जगलों. कुठल्या अट्टाहासानं आईनं आम्हांला जगवलं, कुणास ठाऊक ! सारं जग उत्कर्ष आणि चैतन्य यांच्या चाकोऱ्या ओलांडीत पुढें पुढें चाललं होतं नि आम्ही मात्र धूर ओकणाऱ्या दिवटीभोंवतीं रात्र संपली, उद्यां काय ? या काळजीनं आणि काजळीनं काळंवडून गेलों होतों. तेव्हां तुमच्याभोंवतीं तेजाचे फुगे होते आणि आमच्याभोंवतीं अंधाराचीं वलयं फिरत होतीं. तेव्हां मीं अनुभवलं कीं, जगांत सत्यापेक्षां सत्तेचं मोल होतं. संततीपेक्षां संपत्तीला मान मिळतो.

**ाऊकाका :** दारिद्र्याच्या बेचैनीनं माणूस पैशासाठीं हैवान बनावा, विधायक बनतां तो विघातक बनावा, हें कदाचित् स्वाभाविक असेल! पण दानत, ाल, अब्रू यालाही तो पारखा होईल? (जरा वेळानें) त्यांतदेखील ज्या ाणसाचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं त्या दाजीसाहेबावर त्यानं अशा मत्कारिक तऱ्हेनें सूड उगवावा काय!

**ीनिवास :** भाऊ, त्याला काय दाजीसाहेबांची माहिती आहे? आज त्यांच्या ीवनांत जें मोठेंपण त्यांनीं मिळवलं त्या यशाची इमारत ही—

**ागेश :** स्वार्थाच्या पायावर उभारलेली आहे. त्यागाच्या नाहीं. (भाऊकाका ा श्रीनिवास आश्चर्यचकित होतात.) त्यांनीं स्वार्थ साधून परमार्थ साधला! ाचं राज्य त्याला राजी! ज्याचा कायदा त्याचा फायदा, हें तत्त्व त्यांनीं ेपूर ओळखलं आहे.

**ीनिवास :** नागेश, दाजीसाहेबांवर कुठलेही आरोप करण्याची तुझी लायकी ाहीं...

**ागेश :** श्री, अरे ही वस्तुस्थिति आहे. फायदा ओळखून पगडी ठेवून टोपी ढविणारीं, रावसाहेबी टाकून दे. भ. या पदवीच्या मागें लागलेलीं हीं माणसं ाहिलीं, त्यांनीं नीति-अनीतीच्या नि साम्यवादाच्या झोंकलेल्या गप्पा ऐकल्या ाणि आपल्या बेताल वागणुकींतून मानवतेचे सूर काढले, कीं आम्ही त्यांना ाक्यावर घेतों, नाचतों! (स्तब्धता)

**ाऊकाका :** मला माहीत आहे नागेश! दाजीसाहेब प्रागतिक पक्षाचे एके ाळचे पुढारी, पुढें ते राष्ट्रीय पक्षाला मिळाले. आज एक असामान्य बुद्धीचे ाणावलेले वकील म्हणून त्यांची मंत्रिपदावर नेमणूक झाली, पण यांपैकीं ठलीच गोष्ट त्यांनीं स्वतःच्या स्वार्थासाठीं केली असं म्हणतां येणार नाहीं. ऱ्यानं पैसा ओढणारे आमचे मालक आपली वकिली सोडून, श्रद्धेनें, कनिष्ठतेनें आपल्या ध्येयमूर्तीच्या मागें चाललेले आहेत.

**ीनिवास :** ही गोष्ट काय त्यांनीं स्वार्थ साधण्यासाठीं केली?

**ागेश :** (थोडासा घुटमळतो) पण म्हणून त्यांनीं केलेल्या साऱ्या चुका ांना क्षम्य आहेत? (थांबून) मीं क्षमा केली नाहीं, करणार नाहीं! जरा वेळानें) भाऊ, प्रागतिक पक्षाचे पुढारी होण्यापूर्वी दाजीसाहेब सरकारी कील होते हें माहीत आहे तुम्हांला?

**भाऊकाका :** गेलीं पंधरा वीस वर्षें मी त्यांच्याकडे आहें पण...

**नागेश :** त्यापूर्वीची गोष्ट आहे. जवळ जवळ वीस–बावीस वर्षांपूर्वीची! नवीनच हुद्दा मिळालेले दाजीसाहेब आपल्या महत्त्वाकांक्षेच्या धुंदींत होते. त्या वेळीं अराजकांना शिक्षा ठोठावण्यांत परकीय सत्तेला फार मोठं साहाय्य केलं होतं त्यांनीं! या साऱ्या गोष्टी आज जग विसरून गेलं असलं तरी मी विसरलों नाहीं. अशाच एका खटल्यांत माझे वडील गोवले गेले. त्यांनीं लिहिलेलं एक पत्र एवढाच पुरावा त्यांच्या विरुद्ध होता. जर तें पत्र नाहींसं करतां आलं असतं तर साराच पुरावा कोसळत होता. पण दाजीसाहेबांनीं मात्र त्या तेवढ्या पत्रावर साऱ्या खटल्याचा डोंगर रचला. ( जरा वेळानें ) केवळ दाजीसाहेबांमुळें माझ्या वडिलांना शिक्षा झाली.

**भाऊकाका :** असं कसं म्हणतां येईल नागेश?

**श्रीनिवास :** न्यायदेवतेच्या पवित्र मंदिरांत जें सत्य तें लपवणं हा गुन्हा असतो.

**नागेश :** न्यायदेवता आंधळी असते. हें सारं मला समजतं! पण कुठली न्यायदेवता? परकीय सत्तेची न्यायदेवता? अन्यायाला न्याय म्हणणारी न्यायदेवता? ( तीच गोष्ट मनांत रेंगाळत असल्यासारखें ) खुद्द माझ्या आईनं पदर पसरून दाजीसाहेबांची विनवणी केली तरीसुद्धां दाजीसाहेबांनीं ती गोष्ट साफ नाकारली—

**भाऊकाका :** अपरिहार्य म्हणून घडलेल्या त्या प्रकारामुळें—

**नागेश :** भाऊ, प्रश्न चुकीचा नाहीं. पण आज तेच लोक मोठे ठरले आहेत. त्यांच्या कृत्यांचं नेहमींच समर्थन झालं, कर्तृत्वाचं चीज होत गेलं! पण माझ्या वडिलांना झालेली शिक्षा ही एक जन्माची शिक्षा होऊन बसली. नोकरी नाहीं, धंदा नाहीं, उलट सरकारची बारकाईनं नजर, अशा रीतीनं त्यांनीं परवांपर्यंत दिवस काढले. आज स्वातंत्र्य मिळालं, पण काय फरक पडला? मध्यम वर्गांतले, अर्धवट शिक्षण सोडलेले, गरिबींतले, सर्वस्वाला नागावलेले लोक, असहकार नि कायदेभंग करून वर्षंच्या वर्षं तुरुंगांत पिचले, झिजले, त्यांना काय मिळालं? काय केलंत तुम्हीं त्यांच्या मुलांबाळांसाठीं? खंगलेले माझे दादा बिचारे अजून निर्वासितांसाठीं फंड गोळा करीत, गांवोगांव

वणवण करीत हिंडताहेत! त्यांना टेकायला काठी, निवाऱ्याला झोपडी, याची तरी फिकीर कधीं केली कुणीं?

[ क्षणभर कुणीच बोलत नाहींत. वातावरणांत चमत्कारिक सुन्नपणा भरलेला असतो, तो असह्य होतो. ]

**श्रीनिवास :** म्हणून दाजीसाहेबांचा सूड घेतलास तूं असा?

**नागेश :** हा सूड नाहीं श्री, हे अपमानाचे उतू जाणारे कढ आहेत. भाऊ, प्रत्येकाला पोट असतं. प्रत्येकाला अब्रू असते. कपड्याच्या आवरणांत दडलेलीं सारीं शरीरं पंचमहाभूतांचीं बनविलेलीं असतात. दाजीसाहेब स्वार्थी लोकांचे एक प्रतिनिधि आहेत. माझ्या वडिलांच्या बाबतींत ज्यांनीं अपमानास्पद वागणूक माझ्या कुटुंबाला दिली, त्या दाजीसाहेबांच्या मोठेपणाची बेगड ओरबाडून काढण्यासाठीं मी असा वागलों. आज तुम्ही प्रतिष्ठेनें जगतां आहांत, म्हणून तुम्हांला समाज किंमत देतो. भाऊ, दाजीसाहेबांना म्हणावं आज तुमचीं मुलंबाळं, आश्रित, मोठेपणा मिरवितात ते मायेच्या सांवलींत, नीतीच्या शालींत, पैशांच्या ढिगाऱ्यावर! तें सारं दूर करतांच तुमची लायकी, तुमची किंमत काय रहाते हें पहा! ( पुन्हां स्तब्धता. )

**भाऊकाका :** पण नागेश, या सगळ्यांत तुम्ही एक गोष्ट मात्र सोयीस्करपणें विसरून गेलांत! तुम्ही सूड घेत होतांत. आणि ऊर्मिला प्रेम करीत होती. तुमच्या डोळ्याभोंवतीं धुकं पसरलं होतं आणि त्या पलीकडच्या शुक्राची प्रेममयी चादणी आपल्या तेजानं ऊर्मिलेच्या डोळयांत प्रकाशत होती. आपलेपणाची ओढ लागलेली ऊर्मिला लग्न करावं, संसार सजवावा, एकमेकांच्या मिठींत जग विसरून जावं, या अनिवार इच्छेनें तुमच्याकडे धावली अन् तुम्ही मात्र जग विसरूं शकेत नव्हतां. पैसा विसरूं शकत नव्हतां, सूड विसरूं शकत नव्हतां! ( पुन्हां चमत्कारिक स्तब्धता. )

**श्रीनिवास :** छे! भाऊ, कशाला तुम्ही त्याला एवढं आर्जवून सांगतां? ज्या माणसाला एकनिष्ठता, प्रेम या कुठल्याच भावना नाहींत, त्याच्याजवळ कशाला ऊर्मिलेच्या प्रेमाची करुण कहाणी सांगतां भाऊ! केवळ स्वतःच्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं ऊर्मिलाला फसविण्यासाठींच त्यानं तिच्याशीं ओळख केली, परिचय वाढवला.

**नागेश :** श्रीनिवास, खरं सांगूं ? श्री, खरंच सुरवातीला मीं ऊर्मिलाशीं परिच करून घेतला तो केवळ त्याच हेतूनं. तिची उत्कटता, श्रद्धा, एकनिष्ठत माझं भान हरपून टाकी, पण क्षणभरच ! कारण ऊर्मिलावर प्रेम केलं म्हणू कांहीं ऊर्मिला मला साध्य होणार नव्हती.

**भाऊकाका :** कां नाहीं ? आपल्या मुलीच्या मर्जीविरुद्ध दाजीसाहेब—

**नागेश :** ( हंसतो ) त्यांनीं ठरवलं होतं कीं, श्रीनिवासला ऊर्मिला द्यायची जें जें आपलं तें तें सारं त्याला द्यायचं. ऊर्मिलाचं प्रेम आणि माझी इच्छ ऊर्मिलाचं सर्वस्व आणि माझं सुख, यापेक्षां दाजीसाहेबांची मर्जी आणि ऐश्व यांच्या डोलकाठ्या जास्त उंचावलेल्या होत्या. वैभवाच्या उन्मादांत हातांत हा देणारी स्त्री मला हवी होती ! नुसत्या प्रेमासाठीं ऊर्मिलाचा स्वीकार करण्या माझ्या व्यवहारी मनानं नाकारलं. ( जरा वेळानें ) आणि तसं नाकारतां ठरवलं कीं, सूड घ्यायचा, पुरेपूर बदला घ्यायचा ! मीं ऊर्मिलाच्या विश्वासाच फायदा घेतला. ज्याच्या पायापाशीं पदर पसरून माझी आई दीनवाण झाली त्याच्या मुलीला मीं अक्षरशः मातीमोल केली. ज्यांच्यामुळें माझ्य वडिलांना शिक्षा झाली त्या दाजीसाहेबांनीं माझ्या दादांकडे यावं, त्यां पाय धरावेत आणि माझ्या मुलीला पदरांत घ्या अशी भीक मागावी, ही माझ एकुलती एक इच्छा पुरी करण्याचा राक्षसी अट्टाहास मीं धरला. मला वाटल ऊर्मिलाची अगतिकता दाजीसाहेबांना कळेल, ते माझे पाय धरायला येती आणि मग हव्या त्या अटींनीं आपण साऱ्या अपमानाचं पुरेपूर उट्टं काढूं !

**भाऊकाका :** होय नागेश, कदाचित् तें शक्य होतं !

**नागेश :** पण श्रीनिवासनं ऊर्मिलाचं संरक्षण करण्याचं ठरवलं.

**भाऊकाका :** अंहं ! सूड आणि कृतज्ञता या दोन प्रवृत्तींचा झगडा सुरू झाल ज्यांच्यामुळं आपण वाढलों, शिकलों, जगांत पुढें आलों, त्यांच्या मुलीची बेअ वांचविण्यासाठीं, दाजीसाहेबांची प्रतिष्ठा अभंग राखण्यासाठीं, अलकावरी आपल्या प्रेमाचा त्याग करून श्रीनिवास ऊर्मिलाशीं लग्न करण्यास तयार झाल ( जरा वेळानें ) पण नागेश, जर श्रीनिवासनं ही गोष्ट केली नसती तर का झालं असतं ? आपली मुलगी पतिता आहे, बदनाम आहे, या कल्पनेनें पिसाळू दाजीसाहेबांनीं तिला घराबाहेर काढली असती, हांकलून दिली असती

मग त्या बिचारीची काय अवस्था झाली असती याचा विचार केलांत तुम्हीं कधीं?

**श्रीनिवास :** ( भावनाविवशतेनें ) भाऊ —

**भाऊकाका :** ना घर ना दार, ज्याच्या पित्याचं नांव सांगण्याची शरम वाटावी असं मूल उरीं-पोटीं वाढतंय् अशी शीलभ्रष्ट पतिता आसरा शोधीत शोधीत वणवण फिरत सुटली असती. कुणीं दिला असता तिला आधार? कुणीं तिचं समाजाच्या शिव्यांपासून, शापांपासून रक्षण केलं असतं?...

**श्रीनिवास :** भाऊ, भाऊ, पुरे...

**भाऊकाका :** पण कदाचित् तिला आसरा मिळाला असता! दीनांचा कैवारी, अनाथांचा नाथ असा कुणीतरी महाभाग तिला भेटला असता! नागेश, घरदार नसलेल्या निर्वासितांसाठीं फंड गोळा करीत वणवण फिरणाऱ्या आपल्या दादांच्याच आसऱ्याला ऊर्मिला गेली असती तर तिला तिथें जरूर आसरा मिळाला असता.

**नागेश :** ( भावनाविवशतेनें ) भाऊकाका!

**भाऊकाका :** अन् तें मूल आपल्या मुलाचं, माझ्या नागेशचं आहे, ती ज्योत माझ्या देवघरांतल्या नंदादीपाची आहे, ही गोष्ट जर तुमच्या वडिलांना समजली असती, तर केवढ्या यातना झाल्या असत्या त्यांना नागेश? आपल्या मुलानंच एका स्त्रीला अनाथ, निर्वासित केली याचा केवढा विषाद वाटला असता त्यांना? याचा तुम्हीं कधीं तरी विचार केलांत नागेश?

**नागेश :** ( स्वतःचें तोंड झांकीत ) पुरे—पुरे ना भाऊ!

[ क्षणभर विलक्षण शांतता पसरलेली असते. ]

**भाऊकाका :** ( मार्दवानें ) नागेश, तुम्ही जाल ऊर्मिलाकडे? कदाचित् ती तुम्हांला क्षमा करील—श्रीनिवाससाठीं ती तुम्हांला क्षमा करील! नागेश, तुमच्या घराण्याची जागती ज्योत फडफडून विझण्यापूर्वी—

[ इतक्यांत बाहेर मोटार थांबल्याचा आवाज येतो. रागारागांतच ना. दाजीसाहेब प्रवेश करतात. ]

**दाजीसाहेब :** पाहिलंत भाऊ, ज्याला आपण आपला म्हणावं तो कसा उलटतो नि ज्याला वैरी म्हणावं तो कसा तारतो तें? हें पत्र पहा, वाचा. प्रजासत्ता दैनिकाच्या संपादकांनीं लिहिलंय् तें मला. अहो, जो सभ्य तो वर्तमानपत्राचा संपादक झाला तरी सभ्यच! कालच श्रीनिवासाबद्दलच किती तरी गोष्टी मला अलकानं सांगितल्या, पण त्यांवर माझा काडीइतका विश्वास बसला नाहीं. आज हें पत्र पाहिलं अन्—

**श्रीनिवास :** माझ्याबद्दल लिहिलंय् त्या पत्रांत कांहीं?...

**दाजीसाहेब :** हो, आपल्या कीर्तीचे पोवाडे रचले आहेत यांत. वाचाना! (भाऊकाकांकडून पत्र घेऊन तावातावानें श्रीनिवासला देतात.) आज त्यांनीं मला हें आधीं कळवलं, मला साऱ्या गोष्टींचा खुलासा करतां आला म्हणून बरं, नाहीं तर जगांत तोंड काढायला जागा नव्हती. म्हणे सरकारी धोरण मीं काळाबाजारवाल्यांना सांगितलं! अरे ज्यांच्याबद्दल मीं स्वप्नांत कधीं चांगलं पाहिलं नाहीं त्या बदमाष माणसांना मी सरकारी धोरण सांगणार? अन् काय सांगितलं त्याचं मात्र नांव नाहीं! सगळी बनवाबनवी, केवळ एखाद्याचं नांव बद्दू करायचं हा धंदा!

**श्रीनिवास :** (पत्र वाचून) दाजीसाहेब, मीं ही बातमी त्यांना कळविलेली नाहीं.

**दाजीसाहेब :** मीं कळविली नाहीं? मग काय त्यांचा नि तुझा हेवादावा आहे म्हणून त्यांनीं लिहिलय्? डॉक्टर श्रीनिवास यांच्याकडून ही बातमी आम्हांला कळली असं स्पष्टपणें लिहितोय् हा माणूस, अन् म्हणे मीं कळविली नाहीं! मग काय तुझ्या नांवानं मीं कळवलं हें त्यांना.

**भाऊकाका :** मालक खरोखरच श्रीनिवासच्या नांवानं ही गोष्ट संपादकांना कळविण्यांत आली.

**दाजीसाहेब :** कळविण्यांत आली? म्हणजे?

**भाऊकाका :** (जरा वेळानें) हे मिस्टर नागेश...

**दाजीसाहेब :** नागेश! म्हणजे त्या दिवशीं अलकाकडे आलेले तिचे मित्रच नव्हे का? नमस्ते!

[ त्याच वेळीं बाहेरून ऊर्मिला येते. ती विलक्षण थकून गेलेली असते. ती दाजीसाहेब नि भाऊकाका यांचें बोलणें ऐकते. ]

**ऊर्मिला :** नागेश, तुम्ही इथं आलांत! (एकदम गप्प होते.)

**दाजीसाहेब :** म्हणजे? ऊर्मिला, तुझीसुद्धां ओळख आहे वाटतं अलकाच्या मित्राशीं...

**ऊर्मिला :** ओळख! चांगलाच परिचय आहे आमचा. पुरेपूर ओळखतें मी यांना...पपा यांनींच...

**श्रीनिवास :** ऊर्मिला, ऊर्मिला तुझा विचार तरी काय आहे? हें काय करतेस तूं!

**भाऊकाका :** ऊर्मिला, बेटा माझं ऐक. तूं आतां जा बरं! घरांत जा. मीच आज सर्व गोष्टी मालकांना सांगणार आहें...

**ऊर्मिला :** भाऊ —

**भाऊकाका :** होय, सारं मला समजलं आहे—सारं समजलं आहे. पण तूं... एक अक्षर बोलूं नकोस... तें बरं होणार नाहीं, तो मार्ग नाहीं ऊर्मिला...

**ऊर्मिला :** खरंच भाऊ, तुम्ही म्हणतां तेंच खरं! तो मार्ग नाहीं... खरंच तो मार्ग नाहीं. तो मार्ग वेगळा आहे, फार वेगळा! (झटकन् घरांत जाते.)

[क्षणभरानें दाजीसाहेब कांहीं तरी बोलण्यासाठीं तोंड उघडतात, तोंच बाहेरून अलका प्रवेश करते.]

**अलका :** भाऊ, प्रजासत्ता दैनिकाचा संपादक म्हणजे लाख माणूस! (नागेशकडे पहात) उगीच वाटेल त्या नांवावर आलेल्या बातम्यांवर विश्वास ठेवून भलत्या-सलत्या बातम्या आपण कधींच छापणार नाहीं...छापत नाहीं, असं त्यांनीं मला सांगितलं. मी त्यांच्याकडे गेलें खरी, पण त्यापूर्वीच त्यांनीं ही बातमी पपांना पत्रानं कळविली होती. पपांचा खुलासा होईपर्यंत थांबण्याचं त्यांनीं कबूल केलंय्.

**दाजीसाहेब :** तो केंव्हांच पाठविला मीं त्यांच्याकडे. अरे पण अलका, तूं कशाला गेली होतीस त्या संपादकांकडे? त्या कोड्याच्या बक्षिसाची मुलाखत अजून संपली नाहीं कीं काय?

**अलका :** पपा, कसलं कोडं नि कसलं काय! फाजीलपणा साऱ्या त्या शैलाचा. म्हणे अलका तूं लकी म्हणून तुझ्या नांवानं कोडं पाठवलं! काय माझं नशीब!

**दाजीसाहेब :** तुम्हां मुलांना आपण मोठीं झालों आहोंत हें केंव्हां कळायला लागणार आहे कुणास ठाऊक! एक श्रीनिवासच्या नांवानं अफवा पसरवतोय् नि तुझ्या नांवानं तुझी शैली कोडीं पाठवते आहे! सोन्यासारखीं आपलीं नांवं टाकायचीं नि दुसऱ्याचीं वापरायचीं! काय हा वेडेपणा! गोत्यांत याल एखादे वेळीं अशानं! ( जरा वेळानें ) पण भाऊ, ऊर्मिलाबद्दल काय सांगणार होतांत तुम्ही? हें काय नाटक चालवलंय् या मुलांनीं?

**भाऊकाका :** मालक, हें सारं खरंच एक नाटक होत चाललं आहे! ही अलका, ही ऊर्मिला, हा नागेश नि हा श्रीनिवास, या साऱ्या पात्र्योंनीं एक मोठंच नाटक रंगवून सोडलं गेल्या आठदहा दिवसांत, अन् शेवटीं हा पडद्याआडचा प्रॉम्प्टर पुढें केला भरतवाक्य म्हणायला!

**अलका :** ( नागेशकडे रागानें पहात ) भाऊ, पोलिसाच्या ताब्यांत नाहीं दिलंत तुम्हीं या नागेशना?

**नागेश :** नाहीं, त्यापेक्षां जबरदस्त शिक्षा व्हावी म्हणून मोकळंच ठेवलंय् त्यांनीं मला ....

**भाऊकाका :** होय नागेश, त्याहीपेक्षां मोठी शिक्षा द्यायला हवी तुम्हांला ... तुम्हीं पण ती पत्करली पाहिजे ....

**दाजीसाहेब :** पोलीस? शिक्षा? अरे हा काय फरासखाना आहे का कोर्ट? काय आहे काय हें भाऊ? अन् या साऱ्यांशीं तुझ्या मित्राचा काय संबंध? अलका,

**अलका :** कोण माझा मित्र! ( तुच्छतेनें ) हा नागेश?

**दाजीसाहेब :** ( विलक्षण गंभीरपणानें ) भाऊ, हा नागेश कोण?

**श्रीनिवास :** ( मध्येंच ) आहे एका त्यागी देशभक्ताचा खुनशी नि माथेफिरू मुलगा!

**भाऊकाका :** श्रीनिवास, ( श्रीनिवास गप्प होतो ) वडिलांना शिक्षा झाली, सारी इस्टेट सरकार जमा झाली, दारिद्र्यांत पिचला, यामुळें कावून सूड उगवीत होता तो ....

**दाजीसाहेब :** सूड? कुणाविरुद्ध सूड? काय, आहे काय हें?

**भाऊकाका :** आपल्याविरुद्ध, खुद्द आपल्याविरुद्ध मालक!

**दाजीसाहेब :** काय? माझ्याविरुद्ध? मीं काय केलं?

**नागेश :** ( एकदम ) कसं आठवेल तें तुम्हांला! पण कोणे एके काळीं अराजकांचे खटले आपण सरकारतर्फे चालवीत होतां हें तरी आठवतंय्? ( आवेगानें ) तशाच एका खटल्यांत माझे वडील गोवले गेले .... त्यांना .... माझ्या वडिलांना .... अमानुषपणें तुम्हीं शिक्षा देवविलीत .... तुम्ही —

**दाजीसाहेब :** ( आठवीत ) होतों मी एके काळीं सरकारी वकील! पण ...? पण आपल्या वडिलांना .... मीं शिक्षा .... मीं ....

**भाऊकाका :** मालक, फार वर्षांपूर्वीच्या गोष्टी! पण काळ लोटला तरी व्रण बुजत नाहींत. तुमच्यामुळें ज्याच्या वडिलांना शिक्षा झाली, त्याच्यापाशीं तुम्हीं लाचार व्हावंत, जिच्या पदर पसरून केलेल्या विनवणीला तुम्हीं मानलं नाहीं, तिच्याजवळ माझ्या मुलीला अब्रूदार स्त्री म्हणून जगूं दे .... अशी भीक मागावीत, अशा अट्टाहासानें ही परिस्थिति नागेशनं निर्माण केली. ऊर्मिला फसली. याच्या जाळ्यांत अडकली ....

**अलका :** (एकदम पुढें होऊन) मग मात्र ऊर्मिलाला वांचविण्यासाठीं, तिच्या बाळाचं जीवन, तुमची प्रतिष्ठा सारं अभंग राखण्यासाठीं श्रीनिवासनं ठरवलं कीं, आपण ऊर्मिलाशीं लग्न करायचं! हो ना भाऊ? ( भाऊ मान डोलावतात ) माझ्या श्रीनिवासनं!

**भाऊकाका :** या अलकावर त्याचं प्रेम असून! ( अलका लाजून मागें होते )

**नागेश :** केवळ शहाजोगपणा! पण तुम्हांला कधींच पटायचं नाहीं कीं यांत श्रीनिवासचा स्वार्थ होता.

**भाऊकाका :** नागेश, स्वतःच्या आड येणारे सारेच तुम्हांला स्वार्थी दिसत होते...

**श्रीनिवास :** सारेजण मला स्वार्थी म्हणताहेत याची मला कल्पना होती. पण त्याहीपेक्षां ज्यांनीं मला संभाळला, मोठा केला, त्यांच्या मुलीवर ओढवलेला प्रसंग भयंकर होता. ( जुन्या गोष्टी आठवीत ) माझ्या वडिलांचा अवाढव्य कारखाना. तो पुढें नीट चालेनासा झाला. कर्ज वाढूं लागलं. सगळ्या गोष्टी संभाळणं जड जाऊं लागलं! चलती होती तोंवर गोळा झालेले चार नातेवाईक सुगी संपून पांखरं जावींत त्याप्रमाणें दूर झाले. शेवटीं वडिलांनीं आत्महत्या केली. मी

एकटा...पोरका....दहा वर्षांचा पोरगा! अशा वेळीं दाजीसाहेबांनीं मला आश्रय दिला. ( आवेगानें ) कसं विसरूं शकेन मी हें? मीं ठरवलं, ऊर्मिलेला वांचवायचं.... ठरवलं, कीं तिच्याशीं लग्न करायचं!

**अलका :** श्रीनिवास!

**श्रीनिवास :** अलका, तूं माझ्यावर चिडली आहेस हें मला उघड उघड दिसत होतं! पण तरीही.... तरीही अलका, मरणाला कवटाळणारी ऊर्मिला, अनीतीचीं नखं लावून समाजाकडून मारलं जाणारं तिचं बाळ.... हें सारं दृश्य फार भयंकर होतं. ( आवेगानें )अलका, तुझ्या डोळ्यांतले अश्रु मला दिसत होते, पण माझ्या विविद्ध हृदयांतून टप् टप् गळणारं रक्त मात्र मी माझ्याच ओंजळींत सांठवीत होतों.

[ त्यावेळीं पुन्हां बाहेर येऊन उभ्या राहिलेल्या ऊर्मिलेच्या तोंडून श्रीनिवास, असे अस्फुट उद्‌गार बाहेर पडतात. भिंतीचा आधार घेऊन ती उभी रहाते...अलका तिच्याजवळ जाते... ]

**भाऊकाका :** पण परिणाम मात्र असा झाला .कीं, आपल्या चेताच्या आड श्रीनिवास येतोय् हें दिसून येतांच तुमचं मन श्रीनिवासबद्दल कलुषित करण्याचं नागेशनें ठरवलं...त्यानं श्रीनिवासच्या नांवानं वर्तमानपत्राला खोट्या बातम्या पुरवल्या...

**दाजीसाहेब :** बाप रे! तुम्ही सारीं मुलं अजून लहान आहांत असं मी म्हणत होतों. अन् तुम्ही सारेजण...सारे वेडे...सारे अविचारी...!! कुणी सूड उगवताहेत तर कुणी स्वार्थत्याग करताहेत...

**नागेश :** ( चिडून ) महामूर्ख आहोंत नाहीं आम्ही!

**भाऊकाका :** नागेश—

**नागेश :** खोटं नाहीं भाऊ मी म्हणतों तें! दाजीसाहेब, आयुष्यांत कुठल्याच गोष्टींची झळ न लागलेलीं तुमच्यासारखीं माणसं नेहमींच असं म्हणत आलीं आहेत. पण—पण अतृप्त, असंतुष्ट आणि भावनाप्रधान माणूस मात्र नेहमींच अविचारी आणि अविवेकी असतो. त्याला तुमचे सनदशीर मार्ग पसंत नसतात. ( जरा वेळानें हंसत ) पण तरीही...तरीही मूर्ख...महामूर्ख आहोंत! आत्तांचंच पहाना...ज्यांच्याविरुद्ध मी धडपडलों त्यांना आम्हींच न्यायाधीश बनवलं! पाहिलंत? ही पोपटासारखी बोलणारी अलका, हा न्याया-

धिशाला वांचवण्यासाठीं माफीचा साक्षीदार बनलेला श्रीनिवास आणि ज्याला त्याला बेटा माझं ऐक असं सांगून न्यायाधिशाचा बचाव करूं पहाणारे भाऊकाकांसारखे मुत्सद्दी वकील! झालें! लगेच नागेश बदमाष ठरला, माथे-फिरू बनला नि त्याच न्यायाधिशापाशीं न्यायासाठीं सारे गोळा झाले... (हंसतो) पण दाजीसाहेब—

**दाजीसाहेब :** नाहीं...दाजीसाहेब नाहीं...न्यायाधीश म्हणा. नागेश, न्याया-धीश म्हणा. खटला संपेपर्यंत न्यायाधीश!! (एकदम) आणि न्यायाधिशानं न्याय दिला अन् सांगितलंन् कीं, या खटल्यांत खुद्द न्यायाधिशालाच शिक्षा व्हावी...(सारेजण आश्चर्यचकित होतात.) त्यानं सांगितलंन्...माझ्या मुलीला पदरांत घ्या...तिला अब्रूदार स्त्री म्हणून जगूं दे, अशी भीक खुद्द न्यायाधिशानं आरोपीजवळ मागावी...(नागेशच्याजवळ जातात.)

**ऊर्मिला :** (एकदम) पपा...पपा, असं कधींच होणार नाहीं! न्यायाधिशानं न्याय दिला तरी न्यायाची ही उफराटी रीत मला मात्र मंजूर नाहीं!

**दाजीसाहेब :** बेटा, माझं ऐक! ही उफराटी रीत कशी होईल? कळत न कळत असं कां होईना, पण नागेशच्या साऱ्या सद्भावना नाहींशा होण्यास मी कारणीभूत झालों हें का खोटं आहे? आणि शिवाय ऊर्मिला, मुलीच्या बापाला जांवयाचे पाय धरण्यांत अपमान तरी कसला? बोहल्यावर जांवई उभा रहातो तोच मुळीं सासऱ्यानं पाय धुतल्यावर! नाहीं का भाऊ? (भाऊ कांहींच बोलत नाहींत.)

**ऊर्मिला :** पण पपा...पपा, तरीही या गोष्टीचा हा असा शेवट होणार नाहीं भाऊ, तुम्ही म्हणालांत, याचा मार्ग फार वेगळा आहे...फार वेगळा!

**भाऊकाका :** (भीतीनें) ऊर्मिला...ऊर्मिला तसा नव्हे ग तो अर्थ!

**ऊर्मिला :** पण असल्याच मार्गानं न्यायाधीश ... आरोपी ... साऱ्यांनाच .. (तिचे शब्द अडखळतात.) अलका, मला थोडं पाणी देतेस? माझा घसा बघ कसा कोरडा...कोरडा (ऊर्मिलाला शोष लागतो. ती अंग टाकते. सारेजण—नागेश सोडून तिच्याजवळ जातात.)

**अलका :** ऊर्मिला ... ऊर्मिला!

[भाऊकाका ऊर्मिलाला पाणी देतात. श्रीनिवास तिची नाडी धरतो...एकदम दचकतो...दूर जाऊन उभा रहातो.]

**श्रीनिवास :** मला कळत नाहीं...कळत नाहीं कीं ऊर्मिलानं असं कां केलंन् ?

**दाजीसाहेब :** ( विलक्षण दचकून ) म्हणजे? ...श्रीनिवास...( श्रीनिवास गप्प, दाजीसाहेब त्याच्याजवळ जाऊन खांदे पकडून गदगदां हालवीत ) श्रीनिवास !

**श्रीनिवास :** ( नजर चुकवीत ) दाजीसाहेब, ऊर्मिलाचीं नखं काळीं पडलीं आहेत; तिची नाडी आखडत चालली आहे ( पाठ फिरवून ) विष घेतलं आहे तिनं—

**नागेश :** विष ! ( विचित्र हंसतो. )

**ऊर्मिला :** नाहीं पपा—भाऊ, मी अमृत प्यायलें आहे.

**नागेश :** अमृत ! ( पुन्हां चमत्कारिक हंसतो. )

**ऊर्मिला :** पपा, मीं निवान्त आसरा शोधला आहे. भाऊ, ( क्षीणपणें ) अलका—माझ्या वहिनी......( एकदम मान टाकते. श्रीनिवास तिच्याजवळ जातो. नाडी पहातो. शून्यपणें दूर होतो. )

**दाजीसाहेब :** ऊर्मिला...ऊर्मिला, बेटा हें काय केलंस तूं !

**अलका :** ( रडत ) पपा—भाऊ, ही न्यायाची रीत झाली होय? ( विकलतेनें ऊर्मिलाच्या अंगावर अंग टाकते, पण भाऊकाका तिला दूर करतात. )

**भाऊकाका :** अलका, असं काय करावं बरं! माझं ऐक, ए–इकडे बघ—

[ अलका भाऊकाकांकडे बघत नाहीं. दाजीसाहेब दूर होतात. तेवढ्यांत श्रीनिवास आंतून शाल घेऊन येतो. ती ऊर्मिलाच्या अंगावर टाकतो. दाजीसाहेब शून्यपणें चालत जाऊन दरवाजा लावतात. भाऊकाका अलकाचें सांत्वन करीत असतात. नागेश अजून कसा तरी वेड्यासारखा हंसत असतो. शेवटीं तें ऐकवेनासें होतें नि त्याला आवरण्यासाठीं श्रीनिवास त्याच्याजवळ जातो. पडदा पडतो. ]

**समाप्त**